


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

**साहित्य • कला • संगम**

## श्रेयनामावलि—

*कलाकृति :* **जगन्माता उमा** • भारतीय लोकनृत्यें ( आसाम )

*कथा :*

• सौ. **वसुंधरा पटवर्धन**—शाप • **ग. दि. माडगूळकर**—आंधळाचा राजा
• **अच्युत बर्वे**—खेळ.

*काव्य :*

• **मंगेश पाडगांवकर** • **शंकर वि. वैद्य** • **माणिक गोडघाटे.**

*ललित लेख :*

• **पुरुषोत्तम**—शिवरायाचा आठवावा प्रताप • **स. आ. जोगळेकर**—विषकन्या.
• **गोपाळकृष्ण भोबे**—गोमतीची सांस्कृतिक पदचिन्हे.
• **पु. भा. भावे**—टोपण नांवें • **बाळ सामंत**—रसिकहो चतुर किती

*प्रवास वर्णन :*

• **अनंत काणेकर**—सोनेरी उन्हांतील पाचूंचीं बेटें.

*वैचारिक लेख :*



• अश्लील वाङ्मयाचे रसग्रहण—**प्रा. ल. ग. जोग**
• जुन्यांतलें सोनें—**महाराष्ट्राचा बालकवि**
• लामांच्या देशांत—**श्रीकृष्ण ठाकूर**
• दीपमाला—**पिनाकी, नटराज, विष्णुशर्मा.**

*सदरें :*

• परमेश्वर आणि मी—**आचार्य अत्रे** • **शां. सा. मिरजकर**
• **मोगुबाई कुर्डीकर** • घातली ही पाणपोई—**पु. भा. भावे**
• स्फूर्तींची फुलें—**बाळ सामंत, मधुकर कर्णिक.**

वर्ष १५ वें
अंक ? १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



सांप्रत विदर्भमाहात्म्य महाराष्ट्राच्या राजकीय क्षेत्रांत फार वाढलें आहे. महाराष्ट्रापासून फुटून निघण्याच्या वल्गना कांहीं वैदर्भी पुढारी करीत असोत पण विदर्भ हा महाराष्ट्राचाच एक वैभवशाली भाग होता आणि राहील अशी इतिहासाची साक्ष आहे. ९ व्या किंवा १० शतकांत होऊन गेलेल्या त्रिविक्रम नांवाच्या पंडितानें नलदमयंती स्वयंवराविषयीं नलचम्पू हा ग्रंथ लिहिला. दमयंती ही विदर्भराजकन्या असल्याचें प्रसिद्धच आहे. नळाचा सेनापरिवार जेव्हां विदर्भाची राजधानी कुंडिनपूर येथें पोचला तेव्हां जवळच्या जाणत्यानीं नळाला विदर्भाची माहिती सांगितली. नलचंपूच्या सहाव्या आणि सातव्या उच्छ्वासांत आलेलें हे महाराष्ट्रवर्णन विदर्भासह सर्व महाराष्ट्रीयांना मोठें उद्बोधक वाटेल—

# नलचंपूतील विदर्भ वर्णन

" वरदातर नांवाचा वीर पुरुषांचा हा महाराष्ट्र देश आहे. जिला दक्षिण सरस्वती म्हणतात ती विदर्भानदी या देशांत वहाते. येथील प्रजेला राजाच्या कराचें भय नसून ही प्रजा त्यागी, न्यायप्रिय व दयाळू आहे. ही भूमि समृद्ध आहे. या देशांतील जहागीरदारसुद्धां राजाच्या बरोबरीचे असून उदारपणांत ते हार जाणारे नाहींत. येथील लोक मानी स्वभावाचे आहेत. येथें ' भाण ' या नाट्यप्रकाराची लोकांना आवड आहे. तसेच येथील जनता तरवारबहाद्दर असून शरीरानें बलाढ्य आहे. "

यापुढें नळराजाला पहाण्यासाठीं जमलेल्या स्त्रियांचें वर्णन असून खेडवळ स्त्रियांचा वेष अगदीं नीरस असला तरी त्या पहाणाराचें हृदय आकर्षित करतात, असें म्हटलें आहे. ( वेषोऽयं विरसस्तथापि हृदयं ग्राम्या हरन्ति स्त्रियः )

शेवटीं नळराजा आपल्यासाठीं योजिलेल्या तळावर पोंचला. यानंतर त्याच्या सैन्याकरितां जेवणाची जी व्यवस्था करण्यांत आली होती तिच्या माहितीवरून महाराष्ट्रीय जनतेच्या खाद्यपेयांसंबंधांतील आवडी-निवडीचा थोडासा परिचय करून घेतां येतो.

महाराष्ट्रांत शाकाहाराचें प्राधान्य होतें. पेय, आस्वाद्य, कवल्य, लेह्य, इत्यादि सारे प्रकार होते पण त्यांत मत्समांसाचा अभाव होता. उत्तर पूर्व पश्चिम या दिशांच्या लोकांना मत्समांसविरहित अन्न खाण्याचा सराव नसल्यानें विदर्भातील शुद्ध शाकाहार त्यांना कठिण वाटला. त्रिविक्रमानें ' विरलः खलु दाक्षिणात्येषु मासांशनव्यवहारः ' असा स्पष्ट अभिप्राय नमूद केला आहे. जेवतांना चार प्रकारचे मसालेवजा पदार्थ मिसळलेला उसाचा रस पिण्याचा तेव्हां प्रघात असल्याप्रमाणें त्याचा उल्लेख आलेला आहे. दहीताकाचाहि निर्देश आहे. ' दधिद्रवा ' मागें स्निग्ध व लन्ध अशी दोन विशेषणें आहेत. दूध, दही, तूप, साखर, मध, फळांचे रस, आंबट, तिखट, खारट चवीच्या चटण्या, कोशिंबिरी, लोणचीं इत्यादिकांसह आलेले ' निगानावि पानकाना ' हे शब्द मद्याची सूचना देणारे वाटतात.

भोजनोत्तर ' धृतदिग्ध हस्ततळ ' चंदनानें सुगंधित व स्वच्छ केले गेल्यावर तांबूल वाटण्यांत आले व प्रत्येक सैनिकाला ' शालतंतु-मृदु ' अशीं दोन वस्त्रें मिळालीं.




अनुक्रमणिका



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : ३

**जगन्माता उमा**

पार्वती मोषधी मेकामपर्णां मृगयामहे ।
शूली हालाहलं पीत्वा यया मृत्युञ्जयोऽभवत् ॥
अपर्णैव लता सेव्या विद्वद्भिरिति मे मतिः ।
यया वृतः पुराणोऽपि स्थाणुः सूतेऽमृतं फलम् ॥

औषधी एक ही देवी पार्वती शोधितों अम्हीं ।
विषदग्ध शिव तो झाला मृत्युंजय हिच्यामुळें ॥
अपर्णा वल्लरी घ्यावा बुधांनीं आसरा हिचा ।
हिनें पुरातन-स्थाणू वेढितां अमृतें फळे ॥

—मंगेश पाडगांवकर

अनुक्रमणिका







या महिन्यांतील माननीय व्यक्ति



## वज्रधारा-लिगन्ह लामुंटाचू

' लिगन्ह लामुंटाचू ' उर्फ १४ वा दलाई लामा वज्रधारा या व्यक्तीनें आपल्या नाट्यपूर्ण पलायनामुळें आंतरराष्ट्रीय राजकारणांत फार मोठी खळबळ उडवून दिली. ३० लाख अज्ञ आणि मागासलेल्या जनतेवर सर्व प्रकारची हुकुमत गाजविणाऱ्या या ' वज्रधारी ' चें हें पलायन इतिहासाला तरी नवीन नाहीं. १९१० सालीं चिनी लष्करी कारवाइमुळें १३ व्या दलाई लामानें असाच ल्हासांतून पळ काढला आणि थेट दार्जिलिंग गांठलें. पाहुणा असला, मग तो कसाहि असो त्याचं स्वागत करण्याची भारतीयांची प्राचीन परंपरा ब्रिटिश सरकारनेंहि तंतोतंत पाळली आणि १३ व्या दलाई लामाची मोठी आलिशान बडदास्त ठेवली—

आज त्याचा हा ' वंशज ' लिगन्ह लामुंटाचू यानें पलायनांत आपणहि मागे नाहीं हें सिद्ध केलें आहे. १९३३ सालीं चिंघाई भागांतील एका गरीब शेतकऱ्याच्या घरीं जन्म पावलेल्या या बालकाचें भाग्य अचानक उदयाला आलें. चीनी सरकारचा त्यावेळचा राजकीय प्रतिनिधि ' रेतिंग हुटख्टू ' यानें या लामाचा शोध लावला आणि तो वयांत येईपर्यंत म्हणजे १९४० पर्यंत तिबेटचा राज्यकारभार पाहिला. १९४० सालीं ' दलाई लामा वज्रधारा ' अशी पदवी लिगन्ह लामुंटाचू याला बहाल करण्यांत आली. वर्षानुवर्षे तिबेट अज्ञानाधकारांत चाचपडत आहे पण दलाई लामा आणि त्याचे आप्त यांचें शिक्षण नव्या जगरहाटीप्रमाणें झालेलें आहे. त्याचा एक भाऊ अमेरिकेंत प्राध्यापक आहे ही नवलाची गोष्ट पण सत्य आहे. तिबेटी जनतेचें आध्यात्मिक नेतृत्व करणारा हा धर्मगुरु आणि राजप्रमुख, या जनतेचा सर्वांगीण विकास करूं शकला नाहीं हें सत्य आहे. रस्तेबांधणी, साक्षरता प्रसार, धरण योजना, सोन्याच्या खाणींची दुरुस्ती इत्यादि नवतिबेटच्या पुनर्रचनेच्या मिषानें पेकिंग सरकारनें तिबेटमध्यें जो धुमाकूळ चालविला त्याचा अपरिहार्य शेवट या राजप्रमुखाच्या पलायनांत व्हावा हीच या घटनेतील शोकांतिका ! अर्थात् या पलायनानें त्यांनीं नेहरू सरकारला आणि भारतीय कम्युनिस्टांना सारखेंच पेचांत पाडलें ही गोष्ट निर्विवाद.

• • •



## भारतीय लोकनृत्यें

( आसाम )

भारतीय लोकनृत्यांच्या परंपरेंत आसामची देणगी बहुमोलाची. ४८० वर्षांपूर्वी शंकरदेव नामक एका समाजसुधारकानें आसाममध्यें सामाजिक, धार्मिक पुनरुजीवनाचें महान् कार्य केलें. या शंकरदेवानें कामरुप नृत्याची कला अवगत करून घेतली आणि आसामच्या लोकनृत्याला एक नवें वळण लावलें.

आज आसामच्या लोकनृत्यांत धर्माचें आधिष्ठान महत्त्वाचे आहे. त्यांत कृष्णलीलेला प्राधान्य आहे. पण आसामच्या आदिवासींची लोकनृत्यें अधिक वैचित्र्यपूर्ण आहेत. दरवर्षी एप्रिल महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत आसामध्यें बिहु नांवाचा एक सण साजरा केला जातो. या दिवशीं रात्रौ टिपूर चांदण्यांत आसामी तरुण तरुणी, हातांतहात घालून रात्रभर बिहु नृत्य करीत असतात. ती सारी रात्रच नृत्यगायनानें भारून गेलेली असते.

आसामची राजधानी शिलाँग. या शिलाँगच्या परिसरांत खासी या आदिवासींचा एक नृत्यप्रकार म्हणजे आसामच्या लोकनृत्यांचें एक मोठें वैभव. ढोलक्या तालावरचा द्रुत पदन्यास म्हणजे तारेवरच्या कसरतीपेक्षांहि कठिण. हातांच्या हालचाली या पदन्यासाशीं जुळल्या पाहिजेत.

आसामच्या नृत्यप्रकारांपैकीं ' नागा ' लोकांचे चित्रविचित्र नाच म्हणजे भारतीय लोकनृत्यांतील एक महत्त्वाचा विभाग. आसाम उत्तर ब्रह्मदेश यांच्या सरहद्दीवरच्या दुर्गम प्रदेशांतील हे ' नागा ' लोक नृत्यप्रकारांत फारच कुशल आहेत. त्याच्या वेगवेगळ्या जमाती आहेत आणि प्रत्येक जमातीचा स्वतंत्र नृत्यप्रकार अस्तित्वांत आहे. पक्ष्यांची पिसें आणि भाले यापासून केलेली त्यांची उंच आणि पिसाऱ्यासारखीं शिरस्त्राणें, शिंगापासून आणि दगडापासून केलेल्या माळा आणि पितळेची बाहुभूषणें अशा पोशाखांतील हा नृत्यप्रकार अतिशय प्रेक्षणीय असतो.

भालानृत्य हें सर्व नागा जमातीचें आवडतें नृत्य. नागा या जमातींतील स्त्रिया फार वैचित्र्यपूर्ण नृत्य करतात. ' खांबा लिम ' हा त्यांचा स्त्रीपुरुषांनी समोरासमोर ओळींत उभें राहून करावयाचा नाच फार लोकप्रिय आहे. ' नृइरा लिम ' नांवाचा कोंबड्याच्या झुंजी-सारखा एक नृत्यप्रकार झेमी नागामधील मुलामुलींत फार आवडीनें केला जातो. आसामच्या पठारी भागांतील बोरो लोकांचे नाचांहे प्रेक्षणीय आहेत.

[ पहा चित्रें पान २ वर ]



हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.









चैत्र शके १८८१ • मे १९५९



# शिवरायाचा आठवावा प्रताप !

तीनशें वर्षांपूर्वी महाराष्ट्राच्या ह्या भूमींत एक अद्भूत चमत्कार घडला. शतकानुशतकें दाटून बसलेल्या गाढ अंधेराच्या उदरीं प्रकाशाचे झोत जन्मास आले. वैराण वाटणाऱ्या खडकाळ भूमीनें एकाएकीं हिरवा साजशृंगार धारण केला. जे मृतवत् होते ते जिवंत झाले. जीं केवळ पटक्याच्या खुणेवर नाचणारीं माकडें होतीं, तीं माणसें बनलीं, जे दास होते ते स्वतंत्र झाले.

तीनशें वर्षांपूर्वीं महाराष्ट्राच्या ह्या भूमींत शिवाजी नांवाच्या एका मराठा मुलानें एक दिव्य स्वप्न पाहिलें. तें स्वप्न स्वार्थाचें नव्हतें, तर परमार्थाचें होतें. भीरुतेचें नव्हतें, तर शौर्याचें होतें. परसेवेचें नव्हते, तर स्वातंत्र्याचे होतें. अधर्माचे नव्हते तर धर्माचे होते. वयाच्या केवळ पंधराव्या वर्षी शिवाजीनें हें भव्य स्वप्न पाहिलें. हें स्वप्न राष्ट्राच्या व महाराष्ट्राच्या पुनरुत्थानाचे होते. गौरवाचे होते. हे स्वप्न राष्ट्राच्या व महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचें होतें, स्वत्वाचे होतें, सामर्थ्याचे होतें, स्वाभिमानाचे होतें. कांहीं निकडीच्या प्रयत्नांचें हें स्वप्न होतें. हें स्वप्न तेजाचे होते. सुरवृत्तीचे होते. हिंदवी स्वराज्याचें हें स्वप्न होतें. सह्याद्रीच्या व सातपुड्याच्या साक्षीनें शिवाजीनें हें स्वप्न पाहीलें. कृष्णेच्या व गोदेच्या साक्षीनें शिवाजीनें हें स्वप्न पाहिलें. मराठी आकाशाच्या व मराठी भूमीच्या साक्षीनें शिवाजीनें हें स्वप्न पाहिलें. मराठी देवतांच्या व मराठी संतांच्या साक्षीनें शिवाजीनें हें स्वप्न पाहिलें. पूर्वजासाठीं व वंशजासाठीं शिवाजीनें हें स्वप्न पाहिलें.

कारण पूर्वजांना संतुष्ट करीन, व वंशजाना प्रेरणा देईन असेंच शिवाजीचें स्वप्न होतें. शिवाजीचे स्वप्न अद्भुत होतें, चकित करणारें होतें. परकीयांसाठीं शस्त्र चालविणाऱ्या शहाजी राजांचा मुलगा आपल्या तलवारीच्या टोकावर एक स्वातंत्र्य सिंहासन उभे करण्याचें स्वप्न पहात होता. वैयक्तिक उत्कर्षाचे नव्हे, तर राष्ट्राच्या उत्कर्षाचे स्वप्न तो पहात होता. यवनसत्तेच्या सेवेचे नव्हे, तर यवनसत्तेच्या निःपाताचे स्वप्न तो पहात होता.

अतिशय धाडसी, कल्पनेलाहि कुंठित करील असें हे स्वप्न होतें. शिवाजी नांवाचा हा पंधरा वर्षांचा मुलगा अखेर बोलत तरी काय होता ? हा खरोखरच शुद्धीवर होता काय ? शक्यतेचा व बलाबलाचा त्यानें कांहीं विचार तरी केला होता काय ? हिंदवी स्वराज्याची कुठली अशक्यप्राय व भयप्रद कल्पना हा सांगत होता ! ते स्वराज्य अस्तित्वांत येणें तरी कसें शक्य होतें ? पंधरा वर्षांचें हें कोवळे पोर कुणाशीं भांडण विकत घेण्याच्या गोष्टी बोलत होतें ! हें कुणाकुणाशीं लढणार होतें ? दिल्लीच्या बलाढ्य मोंगल सत्तेशी कीं विजापूरच्या शक्तिमान आदिलशहाशी ? गोवळकोंड्याच्या समर्थ कुतुबशहाशीं कीं समुद्रतटावर गाडून बसलेल्या मातब्बर फिरंग्याशीं ? शहाजीचें हे मिन्याएवढें पोर लढणार तरी कुणाकुणाशी होतें ? आणि हे लढणार होतें कुणाच्या बळावर ? चार फाटक्या मावळ्यांच्या बळावर हे देशव्यापी यवनसत्तेच्या चतुरंग दळाशीं झुंज देणार होतें काय ? आणि यशस्वी होणार होते ? हें शुद्ध वेड होते, नव्हे तर काय ?

खरोखर हें वेडच होतें. मर्यादित स्वार्थांच्या व मर्यादित कल्पनेच्या माणसांना हे सारे वेडच वाटत होते. ह्यांत नवल नव्हतें. पण राष्ट्राचे व समाजाचे सारे दैवच पालटून टाकणाऱ्या प्रतिभावान माणसांना असें वेड लागत असतें. अशा कल्पना स्फुरत असवात.

शिवाजी नांवाच्या एका कोंवळ्या वयाच्या मराठा मुलालाहि आज असे एक वेड लागले होते, अशी एक कल्पना स्फुरली होती.

व्यवहारी शहाणपणाला अनाकलनीय व अशक्य वाटावे असेंच हें वेड होतें. अशीच ही कल्पना होती. असेंच हें स्वप्न होतें. आणि ह्या स्वप्नामागें स्वप्नद्रष्टा शिवाजीशी धांवत होता. हें स्वप्न साकार करण्यासाठीं शिवाजी रान करीत होता. ह्या स्वप्नाच्या धुंदीनें रंगलेली तरुण माणसें तो एकत्रित आणीत होता. व धाडसामागून धाडसें शिरावर घेत होता. मूर्तिमंत काळाला धडक देत होता. पावलोपावली मृत्यूच्या जबड्यांत हात घालीत होता. सुरतेवरील हल्ला, अफझुलखानाचा वध, शाहिस्तेखानाशीं लढत, आग्र्याहून सुटका...ह्या शिवाजीचें चरित्र वेडया धाडसानें रंगून जात होतें. पळापळाला तो स्वतःचे शीर स्वतःच्या हातावर घेत होता ! मृत्यूला जणूं तो मिठी मारीत होता, आणि तरीहि तो मरत नव्हता. पराभूत झाल्यासारखा दिसत होता, पण तरीहि पराभूत मात्र होत नव्हता. पराभूत होत होते त्याचे बलाढ्य शत्रू, मरत होते त्याचे उन्मत्त वैरी. आणि शिवाजी मात्र विजयामागून विजय मिळवीत होता. शिवाजीचे वेड वाढतच चालले होतें. आणि अनेक माणसें त्याच्या वेडानें वेडी होत होतीं. त्याच्या यशस्वी वेडाला आतां काहीं शहाणी माणसेंहि मानाचा मुजरा करूं लागलीं होतीं, शिवाजी काळाला वांकुल्या दाखवुनहि विजयी होता होता. त्याचे वेडे स्वप्न रंगतच चालले होते; आणि त्याला वेडयांत काढणारे खरोखर वेडे ठरत होते. खरोखर हा चमत्कार होता. खरोखर हा संतांचा आशिर्वाद होता. खरोखर ही जिजामातेची शुभेच्छा होती. ही जगदंबेची कृपा होती.

कारण साऱ्या शहाण्यांनी वेड्यांत काढलेल्या शिवाजीला राज्याभिषेक झाला. गोब्राह्मण प्रतिपालक शिवाजीमहाराज सिंहासनाधिष्ठ झाले. स्वातंत्र्य सिंहासनाधिष्ठित झालें. स्वधर्म सिंहासनाधिष्ठित झाला. महाराष्ट्राचा गौरव, महाराष्ट्राचें तेज, महाराष्ट्राचें चारित्र्य, महाराष्ट्राचा पराक्रम सिंहासनाधिष्ठित झाला. आणि महाराष्ट्राची क्रियाशील स्वप्नदृष्टीहि सिंहासनाधिष्ठित झाली. तिनें ह्या देशाच्या अंतीम मुक्तीची कवाडें मोकळी करून ठेवली. येथें सह्याद्रीवर पडलेलें स्फुल्लिंग उजळत गेले, भडकत गेले व देशव्यापि बनले. त्या पेटलेल्या दिव्य अग्नीनें साऱ्या अशुद्धाचा, साऱ्या अशुभाचा स्वाहाकार केला. शिवाजीचे वेडे स्वप्न साकार झालें. प्रत्यक्षांत अवतरलें. त्या स्वप्नानें महाराष्ट्राचे व भारतराष्ट्राचे रूप पालटून गेलें. शतकानुशतकें खिन्न व म्लान असलेलें हे आनंदवनभुवन आतां खरोखर आनंदरूप झालें. तेथील रानेवनें आनंदरूप झालीं. येथील जलाशय आनंदित झाले. येथील तीर्थक्षेत्रें आनंदरूप झालीं. येथील संतसज्जन, येथील धरित्री, येथील आकाश, येथील चराचर वस्तुजात आनंदमय झाला, आनंदरूप झाला.

जादूनें करावी तशी शिवाजी महाराजांच्या दिव्य स्वप्नानें येथें किमया केली. अभक्तांचा नाश झाला. स्वातंत्र्य शत्रूंचा नाश झाला. जे अशक्य वाटत होते ते शक्य झालें. जें केवळ एक स्वप्न होतें ते सत्याचा सारा साराशृंगार घेऊन प्रत्यक्षांत अवतरले.

शिवाजी महाराजांचा त्या दिव्य स्वप्नदृष्टीचें प्रत्येक मराठी माणसानें स्मरण केलें पाहिजे. प्रत्येक भारतीयानें स्मरण केलें पाहिजे. कारण शिवाजी महाराजानीं महाराष्ट्राच्या नेत्रांतून ह्या भारतराष्ट्रासमोरच एक स्वप्न उभे केले. ते स्वप्न निःस्वार्थाचें आहे, परमार्थाचे आहे, स्वातंत्र्याचें आहे. तेजाचें व पराक्रमाचें तें स्वप्न आहे. एकतेचे व संघशक्तीचें तें स्वप्न आहे. मनस्वी क्रियाशीलतेचें आणि जागृत दूरदृष्टीचें तें स्वप्न आहे. उन्नतीचे व गौरवाचे तें स्वप्न आहे. धर्माचें व नीतीचे तें स्वप्न आहे. अवतारी प्रतिभेला स्फुरणारे व सामान्य जनांचाहि कायापालट करून टाकणारे तें स्वप्न आहे. असे एक स्वप्न चंद्रगुप्ताने पाहिलें. असें एक स्वप्न शंकराचार्यानीं पाहिलें. असें एक स्वप्न शिवाजीमहाराजानीं पाहिलें. काळोखाचा प्रकाश करणारी ही स्वप्नें आहेत. ही स्वप्नेंच माणसाला जगवितात व जागवितात. प्रेरणेची व प्रगतीची परंपरा अक्षय राखणारी ही स्वप्नें आहेत. शिवाजी राजानीं केवळ ऐहिक उत्कर्षाची स्वप्नें पाहिलीं नाहींत. गाढ आध्यात्मिक प्रेरणेविना ऐहिक उत्कर्षहि अपूर्ण व अर्थहीन आहे हें त्यानीं अनुभवलें होते. गोकर्ण क्षेत्रीं स्वतःचे शिर महादेवास अर्पण करण्याइतकी विरक्ति त्यांस आली होती. आणि तरी ती विरक्तीहि त्यानीं जिंकली. उपभोगाचे ते दास बनले नाहींत, सिंहासनाचे व सत्तेचेहि दास बनले नाहींत ह्या साऱ्यांचे ते स्वामी होते; व ते स्वामी होते स्वतःचेच, पूर्णावतार श्रीकृष्णाची जी परंपरा तीच त्यांचीहि परंपरा होती. त्या भगवंताचे जें स्वप्न तेंच त्या अष्टपैलू प्रतिभेच्या महापुरुषाचेहि स्वप्न होतें. महाराष्ट्राच्या पुण्यपावन कुशींत जन्मलेल्या ह्या महापुरुषाचे व त्याच्या प्रस्फूर्त स्वप्नाचे आपण आज स्मरण करूं या. आपल्या म्लान व मलिन वृत्तींना आपण त्यांच्या पुण्यस्मरणाचे तेज देऊं या. मालवणाऱ्या व कांजळणाऱ्या पणत्या त्यांनीं निर्माण केलेल्या अग्नीवर आपण पुनश्च चेतवून घेऊं या !

— पुरुषोत्तम

●●●

## जहांगीर आणि गुलाबाचं अत्तर



गुलाबाच्या अत्तराचा शोध माझ्याच काळात लागला. गुलाबपाणी तापवल्यावर जो तेलाचा थर जमतो तो पाहून नूरजहान बेगमच्या आईच्या डोक्यात या अत्तराची कल्पना आली. अशा प्रकारें हें अत्तर काढून घेतल्यावर एका नामांकित अत्तराचा शोध लागला.

# विषकन्या

प्राचीन शिल्पकलेचे नमूने म्हणजे भारताच्या उज्ज्वल संस्कृतीचे जागते साक्षीदार. 'खजुराहो' येथील शिल्पकला म्हणजे भारतीय शिल्पकलेचा एक बहुमोल ठेवा. महाराष्ट्राचे रसिक विद्वान श्री. **स. आ. जोगळेकर** यांच्या लेखणींतून उतरलेला खजुराहो येथील एका शिल्पावरचा हा लेख म्हणजे एक शिल्पकाव्य आहे.

---

मुंबईस प्रसिद्ध होणाऱ्या, मार्ग या विख्यात नियतकालिकाच्या जून १९५७ च्या खजुराहो अंकांत महादेव मंदिरांतील एका सुरसुंदरीच्या मूर्तीचें छायाचित्र ३१ व्या पानावर दिलेलें आहे. या मंदिरांत सुरसुंदरींच्या अनेक मूर्ति आहेत, त्यांपैकीं ही एक आहे. मी हें मंदिर पाहिलेलें नाहीं. या छायाचित्रावरून दिसतें कीं या सुंदरीनें तलम वस्त्र सकच्छ परिधान केलेलें आहे; पातळाचा पदर डाव्या खांद्यावरून मागें सोडलेला आहे; ऊर्ध्वांगावर पोट उघडें राहील अशी चोळी धारण केलेली आहे; केशपाशांत, गळ्यांत, दंडांवर, मनगटांवर व घोट्यांवर अलंकार चढविलेले आहेत. तिच्या डाव्या पायाजवळ एक मुलगा बसलेला आहे. विशेष म्हणजे तिच्या डाव्या मांडीवर एक विंचू आहे; मूर्तीच्या प्रमाणानुसार तो चांगला तळहाताएवढा आहे. मोठ्यांत मोठा व विषारी विंचू एवढाच असतो. हा विंचू वर चढत आहे. या छायाचित्राशेजारीं स्पष्टीकरणार्थ टीप दिलेली आहे; ती अशी :

सुरसुंदरी; तिच्या पायावर प्रतीकात्मक विंचू. ही अप्सरा स्नानगृहांतून नुकतीच बाहेर आलेली आहे. तिचा एक हात स्तनावर आहे. जणूं कोणाची चाहूल लागल्यामुळें हा हात तिनें वर घेतला आहे. तिच्या मुद्रेवरील गांभीर्य जरासें चलविचललेलें आहे. तिच्या शरीराचा विक्षेप मंथर आहे. तिच्या अंतरात्म्याच्या नैसर्गिक वृत्तीचा द्योतक आहे.

मार्ग चे लेखक ज्या त्या विषयाचे अधिकारी असतात, असा लौकिक आहे. या टीपेचे लेखक कोण आहेत हें सांगितलेलें नाहीं. कोणीही असो, चर्चेला प्रत्यवाय नाहीं. म्हणून विद्यार्थ्याच्या भूमिकेवरून हा लेख लिहिण्यास प्रवृत्त झालों आहे.

ही सुंदरी स्नानगृहांतून नुक्तीच बाहेर आलेली आहे. या तर्काला पुष्टि देणारी एक ही खूण निदान या छायाचित्रांत मला तरी दिसली नाहीं. तिच्या मांडीवरला विंचू हें कशाचें प्रतीक आहे तें सांगितलेलें नाहीं. तिचा मंथर अंगविक्षेप हा तिच्या अंतर्यामाच्या नैसर्गिक वृत्तीचा द्योतक आहे. (The leisurely bend of her body betokens a poise, which is the natural habit of her soul), म्हणजे नक्की काय, याचा उलगडा होत नाहीं. हा दोष माझा असणेंही शक्य आहे. प्रत्येक ऐहिक शिल्पालाहि कांहीं तरी आध्यात्मिक, प्रतीकात्मक अर्थ आहे असें सांगून सामान्य वाचकाला किंवा प्रेक्षकाला गोंधळांत टाकलें तरच त्या विचाऱ्याला अशा शिल्पाचें किंवा चित्राचें सौंदर्यग्रहण करतां येतें, किंवा असें कांहीं सांगितलें नाहीं तर जें सांगायचें त्याला पुरेसें गांभीर्य येत नाहीं अशी तर या निरीक्षकांची भूमिका नसेल ?



मी हें छायाचित्र पाहिलें तेव्हां मला हळेबीड व वेलूर येथील मंदिरांवरील शिल्पांची आठवण झाली; मी हीं मंदिरें नुक्तींच पाहिलेलीं असल्यामुळें खजुराहो येथील मंदिरें दहाव्या व अकराव्या शतकांतील आहेत आणि वेलूर हळेबीडचीं मंदिरें बाराव्या शतकांतलीं. या सर्व मंदिरांच्या बाह्यांगांवर असंख्य मूर्ति कोरलेल्या शिळा आहेत. या कालखंडांतल्या मंदिरांवर मूर्तींची इतकी गर्दी असते आणि त्या इतक्या तपशीलानें कोरलेल्या असतात कीं त्या त्यांच्या वैशिष्ट्यांसह काळजीपूर्वक पहाणें आणि त्यांचे तपशील ध्यानांत ठेवणें अशक्यप्राय असतें. आपण एकाद्या यात्रेला जातों. शेकडों स्त्रीपुरुष दृष्टीस पडतात. एकादीच मुद्रा, एकादाच अंगविक्षेप, एकादाच पदन्यास चित्तावर ठसतो आणि तोही कालांतरानें पुसट होतो. आतां छायाचित्रें घेण्याची सोपी सोय आहे आणि कांही तपशील वारंवार आळविल्यामुळें ध्यानांत राहिले आहेत, संग्रहीं राहिले आहेत; त्यांच्या अनुरोधानें लिहीत आहे. सामान्य ठसा स्पष्ट आहे, तपशीलांत चूक असणें शक्य आहे. या सावधगिरीनें पुढील मजकूर वाचावा, चूकभूल द्यावी घ्यावी अशी विनंति आहे.

वेलूर येथील चन्न केशव स्वामीच्या मंदिराच्या बाहेरल्या स्तंभांवर मदनिकांच्या अनेक मूर्ति आहेत. पैकीं एकीच्या पायपट्टीवर असाच एक जबरदस्त विंचू आहे. वाटाडे सांगतात कीं स्नानानंतर वस्त्र परिधान करीत असतांना तो तिला दिसला व तिनें तो झटकून टाकला. जाणारे वाटाडे असेंही सांगतात कीं शिल्प बीभत्स रसाचें धोतक आहे. कोण जाणे. येथें ही स्नानाचें धोतक असें कांहींही नाहीं. ही मदनिका विवस्त्र असल्यामुळें असा प्रवाद रूढ झाला असल्यास न कळे. त्याच प्रमाणें गायिकेनें हा विंचू झटकलेला आहे असें ही दिसत नाहीं. येथें आणखी एक शिल्प आहे. यांतली नायिका वस्त्रावरली पाल झटकीत आहे. अंगावर पाल पडणें आपण अशुभ मानतो. असें कांहीं झालें म्हणजे संभाव्य दुष्परिणाम टाळण्यासाठीं वेलूरचे रहिवासी या पालीवर तेल घालतात ! आमच्या भोळेपणाला सीमा नाहीं हेंच खरें.

खजुराहोच्यां सुरसुंदरीचें छायाचित्र पाहतांना आणखी एक आठवण झाली. हळेबीडच्या दोन मदनिकांची. दोघींच्याही गुडघ्यांवर फड्या नागाचा विळखा आहे. यांपैकीं एक नागी किंवा पार्वती असावी, कारण तिच्या शेजारी ही नाग कोरलेला आहे. दोघीहि नग्न आहेत. सबब स्नानाची सूचनाहि नाहीं. नागाचा विळखाच असल्यामुळें झटकण्याचा मुद्दाहि उपस्थित होत नाहीं. (पृष्ठ ४८ वर पुढें चालू)



*नववधू तारानें केवढ्या अपेक्षा बाळगल्या होत्या जन्माच्या जोडीदारासाठीं जिवाचं हवन करायला तीं तयार झालीं होतीं—*

*तिला वाटत होतं कीं त्याला जसें आवडेल तसेंच आपल्या हातून व्हावे, तेंच घडावें, नित्यनेमानें घडावें. जन्मभर आणि जन्मोजन्मीं तेंच घडावें. पण--*



अनुक्रमणिका

**का**ल तारचें लग्न लागलें. आणि आज सगळीं माणसें जिकडचीं तिकडे निघून गेलीं. उरलीं फक्त तारा आणि तिचा नवरा ! " नवरा माझा परमेश्वर आणि मुलं माझीं शाळिग्राम " अशी अवस्था होती. लग्न तर कालच लागलें, मुलांना अजून अवकाश होता. अजून नवऱ्याचीच ओळख नव्हती. काल तर ती या घरांत आली. आल्यापासून ती सारखी माणसेंच पहात होती. तीं माणसें आज गेलीं. सासुसासरे सुद्धां गेले. आणि आतां तारचें लक्ष घराकडे गेलें. नवऱ्यालासुद्धां तिनें आजच ह्कवून तिकडे जातां येतां पाहिलें. आणि एकाएकीं दचकून तिनें स्वतःकडे पाहिलें. आपली हिरवी साडी, हिरव्या बांगड्या, जोडवी, विरवल्या, पाटल्या, बांगड्या, नथ, कुडी, सगळेच मुळीं नवीन होतें. नव्या माणसाचें होतें. नव्या माणसासाठीं होते. त्यामुळेंच जणुं तारा स्वतःच नवीन होऊन गेली. काल सबंध दिवस जे जे सोहाळे झाले, त्यांत आपण निमुटपणेंच नव्हे तर आनंदानें भाग घेतला, याचें तिला आश्चर्यसुद्धां वाटलें. ज्याचें नुसतें नांवच माहीत होतें, त्याचें उष्टें केळें खाल्लें. गौरीहरापुढें बसून सौभाग्याचें मागणें मागितलें. ज्याला ओझरत्या नजरेनें एकदां दोनदांच पाहिलें होतें, त्याच्या गळ्यांत आपली माळ घालून, त्याची माळ आपल्या गळ्यांत घालून घेतली. आणि मग हाताला हात लावून तूप लाह्या अग्नीला अर्पण केल्या. हाताला हात लावून होमाला प्रदक्षिणा घातल्या. पावलावर पाऊल ठेवून सप्तपदी केली. ताराला वाटलें, कीं कालच्या त्या एका दिवसांत आपण खूप दूर आलो. आपला रस्ता बदलला. आपला गांव बदलला. आपलें घर बदललें. आपलें नांव बदललें. आणि आपलें व्यक्तिमत्वहि बदललें. आतां आपण तारा सोहोनी नाहीं. तारा दाते आहोंत. म्हणून तर घरीं आल्यावर त्यांचें नांव घेतलें. हो त्यांचें नांव ! महेश्वर सोमनाथ दाते ! तारा महेश्वर दाते ! आतां त्याच नांवानें जगायचें. त्याच नांवानें मिरवायचें, आणि त्याच नांवानें मरायचें !

ताराला एकदम हंसू आलें. तारा महेश्वर दाते या नांवानें जगण्यापासून मरण्यापर्यंत जाण्यांत अपरिमित सुख होतें. धरलेला हात, टाकलेलें पाऊल, बांधलेल्या मुंडावळ्या, घातलेलें मंगळसूत्र... सहाजिकपणेंच ताराचा हात आपल्या गळ्याशीं गेला. तें रेशमांत ओवलेलें कोरें करकरीत मंगळसूत्र ज्या हातानी कालच आपल्या गळ्यांत बांधलें ते हात......तारा स्वतःशींच लाजली. ते हात गोरेपान होते. बोटें लांब, निमुळतीं होतीं. आणि त्या हातांची मनगटें मजबूत होतीं. त्या हातांचा ओझरता स्पर्श झाला होता. मानेजवळ !

## सौ. वसुंधरा पटवर्धन

केसांना ! पण त्यांची ओळख झाली नव्हती. संवय झाली नव्हती. विश्वास, प्रेम, श्रद्धा......या साऱ्यांची अजून ओळख व्हायची होती. तरीहि त्या हातांची आठवण होतांच ताराचें शरीर कंपित झालें, शरीरभर वीज खेळून गेली. आणि अंतःकरणांत धाडधाड ठोके पडूं लागले.

महेश्वरपंत कामावर गेले होते. आणि तारा घर आवरत होती. विचार करत होती कीं कुठें काय ठेवावें ? घर कसें सजवावें ? कसें सजवलें तर आपल्या जोडीदाराला आवडेल ? रात्रीं जेवायला काय करावें म्हणजे तो संतुष्ट होईल ? त्याची आवड निवड तिला अजून कळायची होती. आणि तरीहि तिला वाटत होतें कीं त्याला जसें आवडेल तसेंच आपल्या हातून व्हावें, तेंच घडावें, नित्यनेमानें घडावें. जन्मभर आणि जन्मोजन्मीं तेंच घडावें. आज सकाळीं तिनें घाईघाईनें भात भाजी केली. आणी तो घाईघाईनेंच जेऊन गेला. त्याला भाजी आवडली कीं नाहीं हें तिला समजलेंच नाहीं. त्याला तिच्याकडे पहायला सवडसुद्धां नव्हती. भराभर कपडे चढवून जिना उतरून तो गेलासुद्धां ! जातांना त्यानें कांहीं सांगितलें नाहीं. कांहीं विचारलें नाहीं. संकोची ! लाजाळू ! महेश्वरपंत संकोची आहेत का ? महेश्वरपंत लाजाळू आहेत कां ? महेश्वरपंत......महेश्वरपंत... किती वेळां तरी नांव घ्यायचें नवऱ्याचें ? मनांतल्या मनांत झालें म्हणून काय झालें ? आणि तरीहि तारा सारखी मनांतल्या मनांत म्हणत राहिली, महेश्वरपंत, महेश्वर, तारा महेश्वर, तारा महेश्वर दाते ! " तारा महेश्वर दाते " या नांवाला एक वेगळाच ताल उत्पन्न झाला आणि त्या तालांत तारा गुंगत चालली.

त्या गुंगींत संध्याकाळ झाली. दिवे लागले. महेश्वरपंत घरीं आले. किंचित अनोळखीपणानें आणि तुसडेपणानें त्यांनीं आपल्या घराकडे पाहिलें. ताराकडे पहाण्यापूर्वीच ताराची धांदल उडाली. स्वतःशींच चूर होऊन ती चहा करायला स्वयंपाकघरांत गेली. भराभर स्टोव्ह पेटवून तिनें चहा केला. आणि तो गाळतां गाळतांच ती थबकली. सायीसकट दूध घालावें कीं सायीशिवाय ? महेश्वरपंतांना साय आवडते कीं नाहीं ? अखेर एका भांड्यांत वेगळें दूध घेऊन, खालीं पहात पहात तारानें चहाचे कप बाहेर आणले.

खालच्या मानेनेंच ती चहा कपांत ओतूं लागली. आणि तिच्या नकळत तिनें वर पाहिलें तेव्हां तिथें कोणींच नव्हतें. मघां आलेले महेश्वरपंत तिथें नव्हते. म्हणजे ? ते गेले कुठें ? तारानें आपल्या तिन्ही खोल्या पाहिल्या. परंतु महेश्वरपंत तिला दिसले नाहींत. एक क्षणभरच हरखून गेलेली तारा दुसऱ्याच क्षणीं खट्टू होऊन गेली. आणि हळूहळू तिच्या लक्षांत आलें कीं महेश्वरपंतांचे बूट दिसत नाहींत. बाहेरून आल्यावर त्यांनीं कपडे काढले नाहींत कां ? मग ते गेले तरी कुठें ?

इथेंच कुठें जवळ गेले असतील असें समजून तारानें चहा झाकून ठेवला. थोडा वेळ ती तशीच बसून राहिली. मग तिनें तिथल्या-तिथेंच अस्वस्थपणें फेऱ्या मारल्या. आणि मग चहाचा सारा सरंजाम उचलून ती पुन्हां आंत गेली. चहा नाहीं झाला म्हणून काय झालें ? किंबहुना चहा झाला नाहीं, म्हणूनच जेवणाची काळजी अधिक घ्यायला हवी होती. मन लावून आणि खपून तिनें चार पदार्थ केले. आणि महेश्वरपंतांची ती वाट पहात बसली. पण आठ वाजले, नऊ वाजले, दहासुद्धां वाजले. परंतु महेश्वरपंत आले नाहींत. तारा अस्वस्थ होऊं लागली. कुणाला विचारावें ? काय विचारावें ?

पण मग तारानें त्यांचें अंथरुण घातलें. उशा ठेवल्या. पायाशीं पांघरुण उलगडून ठेवलें. उशाजवळच्या खिडकींत मोगरीचीं फुलें ठेवलीं.

तोंच दारावर थाप ऐकूं आली. तारानें कडीला हात लावला. आणि हळूंच विचारलें, " कोण आहे ? "










" मी. "

तो अनोळखी स्वर तिला जणुं ओळखीचाच वाटला. तिनें दार उघडलें.

महेश्वरपंत आंत आले. पण त्यांनी तिच्याकडे पाहिलेंच नाहीं. सावकाश त्यांनी कपडे काढले. आंत जाऊन हातपाय धुतले. आणि पुन्हां बाहेर येऊन बसले.

एवढ्या वेळांत तारानें जेवायची तयारी केली होती. दारांत उभी राहून ती धडधडत्या हृदयानें म्हणाली, " जेवायचं झालं आहे. वाढूं ?"

महेश्वरपंतांनी नुसती नकारात्मक मान हलवली. समोरचें पुस्तक उचलून ते वाचूं लागले. अजूनहि त्यांनी तिच्याकडे पाहिलें नाहीं. वा एका शब्दानें तिची विचारपूस केली नाहीं.

तारानें स्वतःला सावरलें. पण नाहीं म्हटलें तरी एक घाव तिच्या जिव्हारीं लागला. महेश्वरपंतांचें अबोलपण हा नुसता संकोच नाहीं हें तिच्या ध्यानांत येऊन चुकलें. महेश्वरपंतांच्या त्या सुंदर चेहऱ्यावर, बसण्याच्या पद्धतींत, तिच्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करून वाचत रहाण्याच्या तऱ्हेंत एक प्रकारची कठोर अलिप्तता होती. या कठोर अलिप्ततेची बोंच तिला लागली. पण त्याचवेळीं तिला कालचा लग्नाचा प्रसंग आठवला. लग्न झाल्यावर भटजीनी त्या दोघांभोंवतीं गुंडाळलेलें सूत तिला आठवलें. आणि सारें विसरून तिनें पुन्हां दाराच्या उंबऱ्यांतूनच विचारलें, " भूक नाहीं ? "

" हूं ! " महेश्वरपंतांनी पुस्तक बाजूला केलें नाहीं.

" बरं नाहीं कां ? " एक पाऊल पुढें येत तारानें विचारलें.

" बरं नसायला काय झालं ? " एक गुरगुरता दृष्टिक्षेप करून हें गुरगुरतें वाक्य महेश्वरपंत म्हणाले. त्यांनी खूप मोठी जांभई दिली. हातानें चुटक्या वाजवल्या. पुस्तक जाग्यावर ठेवलें. आणि दिवा बंद करून ते अंथरुणावर आडवे झाले. खिडकींत ठेवलेल्या मोगरीच्या फुलांना त्यांनी हात लावला नाहीं; कीं जिनें तीं ठेवलीं तिच्यासंबंधीं एक अक्षर उच्चारलें नाहीं.

फुलें ठेवणारी ती मागल्या पावलींच मागल्या खोलींत गेली. मुद्दाम केलेल्या त्या अन्नाकडे तिनें पाहिलें. आणि खिन्न मनानें तें तसेंच झांकून ठेवलें. तिची भूकच मरून गेली होती. दुसऱ्या खोलींत तिनें आपलें अंथरुण घातलें. हतबुद्धपणें तिनें बिछान्याकडे पाहिलें. आणि तिला आठवण झाली कीं, महेश्वरपंतांच्या खोलींत आपण तांब्याभांडें ठेवलें नाहीं. तांब्याभांडें घेऊन ती हलक्या पावलानें निघाली. आणि क्षणमात्र उंबऱ्यांतच थबकली. आंत जावें कीं न जावें असें भय वाटलें. तरी सुद्धां जें केलेंच पाहिजे तें करण्यासाठीं तिनें पाऊल उचललें. झोपमोड होऊं नये म्हणून हलक्या पावलांनी गेली. तरी सुद्धां एखादें चौर्यकर्म करतांना उरांत धडकी भरावी तसें झालें. आणि त्या भरांत तिच्या हातून तें तांब्याभांडें खिडकींत एकदम जोरानें आदळलें.

" कोण आहे ? " महेश्वरपंत एकदम खेकसून ओरडले.

" मी...मी..." चोरासारखी तारा चाचरूं लागली.

" तूं कोण ? "

" मी...मी...तारा..." तारा थरथर कापूं लागली.

" तूं कां आलीस इथें ? चल हो बाहेर." बोलतां बोलतां महेश्वरपंत एकदम उठून बसले. आणि जवळच असलेली दिव्याची गुंडी त्यांनीं दाबली. सबंध खोली प्रकाशानें भरून गेली. त्या प्रखर प्रकाशांत दोघांनीं एकमेकांना पाहिलें. समोरासमोर आणि इतक्या जवळून त्यांनीं प्रथमच एकमेकांना पाहिलें. तारा एकदम मोहून गेली. महेश्वरपंतांच्या रूपावर तारा लुब्ध होऊन गेली. महेश्वरपंतांनी आपल्यावर कठोर शब्दप्रहार केला हें ती विसरूनच गेली. आणि देहभान हरपून तारा त्यांच्याकडे पहातच राहिली. महेश्वरपंत हा एक देखणा पुरुष आहे हें ताराच्या लक्षांत आलें. या देखण्या माणसानें निजताना साहेब लोकांसारखा पट्यापट्यांचा पायजमा घातला होता. आणि अंगांत एक तसलेंच साहेबी कुडतें घातलें होतें. क्षणमात्र ताराला वाटून गेलें कीं आपण फार अशिक्षित आहोंत. आपण फार गबाळ्या आहोंत. आपला रंग कितीहि गोरा असला तरी आपण मडमिणींसारख्या दिसत नाहीं. आपले केस कितीहि मोठे असले तरी साहेबणीचा रुबाब आपल्याला नाहीं. तारा पांच वारच पातळ नेसली होती. तरीहि तिला वाटलें कीं ओंचेपदर खोऊन आणि वेणीचा खोपा घालून आपण या साहेबासमोर उभ्या आहोंत. पहातां पहातां ताराची मान खाली गेली आणि वर मान करून तिच्याकडे तिरस्कारानें पहाणारा तिचा पति तिला ओरडून म्हणाला, " माझ्या परवानगीशिवाय माझ्या खोलींत कोणी यावं हें मला मुळींच आवडत नाहीं. "

तारा एकेक पाय मागें घेऊं लागली. नवऱ्याच्या खोलींत बायकोनें कां येऊं नये हें विचारण्याचें तिच्या मनांत हजार वेळां आलें. पण तिला शब्द सापडेनात. धीर होईना. आपण एक अशिक्षित जनावर आहोंत असेंच तिला वाटूं लागलें. आणि ती पाय मागें घेऊं लागली. तोंड न फिरवतां, महेश्वरपंताना पाठ न दाखवतांच ती पाय मागें मागें घेऊं लागली. एकेक पाऊल मागें घेत घेत ती स्वयंपाक घरांत गेली. आणि तोल गेल्यासारखी धाडकन आपल्या बिछान्यावर पडली. एका नव्याच जगांत ती कोसळून पडली. ज्या जगांत कोणाच्या तरी बाहूवर उचलली जायची, कोणाच्या तरी हातावर झेलली जायची, कोणाच्या तरी छातीवर विसावली जायची, त्या जगांत ती हातपाय तुटल्यासारखी कोसळून खालीं पडली. नवरा ! त्याची खोली ! त्याची परवानगी ! त्याचें दरडावणें ! त्याचा साहेबी पोशाख आणि त्याची हुकमत ! त्याचा सुंदर चेहरा आणि करडें बोलणें ! हें असलें कधींहि न पाहिलेली, कधींहि न अपेक्षिलेली ती तारा बसल्या जागींच गुदमरून गेली आणि बसल्या जागींच फुलून येऊं लागली. महेश्वरपंतांचा सुंदर चेहरा, महेश्वरपंताचे मोत्यासारखे सुंदर दांत, त्यांचे सरळ नाक आणि मोहक जिवणी, लाटेवर तरंग उठावेत तसे वेलांट्या घेणारे ते काळेभोर केस आणि मुख्य म्हणजे महेश्वरपंतांचा निलतांबूस, गुलाबी, गोरा रंग, कीं जो पुरुषांना विशेष शोभतो,...या साऱ्यांनी ताराचें मन फुलूं लागलें. अंतःकरणावर बसलेल्या घावांतून जणुं सुखाची कळ येऊं लागली.

ती कळ दाबून धरीत तारानें अंथरुणावर अंग टाकलें. एकीकडे ती विचार करीत होती आणि तळमळत होती. महेश्वरपंतांच्या दिशेनें चाहूल घेत होती. पण मध्यरात्र उलटून गेली तरी कसलीच चाहूल आली नाहीं. तेव्हां न रहावून ताराच पुन्हां उठली. दाराच्या उंबऱ्यांत उभें राहून तिनें पुन्हां एकदां महेश्वरपंतांना पाहिले.

अनुक्रमणिका






महेश्वरपंत कुशीवर वळत होते. त्यांच्या अंगावरचें पांघरूण त्यांच्या अंगाखालीं गेलें होतें. आपण तें नीट घालावें असें तिच्या मनांत येऊन गेलें. पण ताराला धीर झाला नाहीं. ती नुसती पहात राहिली. महेश्वरपंतानी कुशीवर वळून आपला उजवा हात मांडीपर्यंत लांब सोडला होता. आणि बोटांत लाल खड्याची आंगठी चमकत होती. त्या हातावर ताराची नजर खिळून गेली. किती तरी वेळ तारा अशी पहातच राहिली. आणि मग पहाटें केव्हांतरी ती पुन्हां आपल्या जागेवर येऊन निजली. लग्नाचा दुसरा दिवस जसा उजाडला तसाच तिसरा उजाडला.

आणि तिसऱ्या दिवशींहि तोच अलिप्तपणा, तोच करडेपणा, तोच निष्ठूरपणा पुन्हां प्रत्ययास आला. लग्नाच्या या तिसऱ्या दिवशीं त्यानें चहासुद्धां बाहेर घेतला. स्नानासाठीं तारानें काढलेलें पाणी त्यानें खुशाल ओतून दिलें. आणि नववधूनें केलेल्या स्वयंपाकाकडे त्यानें ढुंकुनसुद्धां पाहिलें नाहीं. लग्न झालेला नवरा हा बायकोचा कोणीहि नसतो याचा अनुभव हा महेश्वर नांवाचा माणूस तिला देत होता.

संध्याकाळीं जेव्हां तो कामावरून घरीं आला तेव्हां तारा त्याच्या कपड्यांच्या घड्या करीत होती. त्या घड्या त्यानें खस्सदिशीं ओढून घेतल्या आणि नाकावर बोट ठेवत त्यानें बजावलें, "माझ्या कपड्यांना तूं हात लावत जाऊं नकोस."

"कां?" ताराचा हात कापत होता.

"कारण माझी मर्जी! माझं कांहीं तूं करावंस अशी माझी इच्छा नाहीं."

"मग तुमचं कोण करणार?"

"तें माझं मी पाहून घेईन."

"पण मी तुमची बायको आहे." तारा एक पाऊल पुढें घेत म्हणाली. बोलतां बोलतां तिची भीति कमी होऊं लागली.

"असं कोण म्हणतो?"

"मी म्हणते. सारं जग म्हणतं. आणि तुम्हीसुद्धां म्हणाल."

"मी नाहीं मानत तसं." महेश्वरानें एक प्रकारच्या भयानक थंडपणानें सांगितलें.

त्या थंडपणांचा ताराला जणुं चटका बसला. पण स्वतःला सावरत ती म्हणाली, "तुमचं माझं लग्न होऊन केवळ तीनच दिवस झाले. पण हे तीन दिवस मी या घरांत राहिले या घरचीं वस्त्रं वापरलीं. या घरचे दागिने घातले. या घरचा आणि तुमचा अभिमान धरला आणि तुमचं नांव लावून......

"माझं नांव तूं लावूं नकोस."

"कां?" हतबुद्ध होत तारानें विचारलें. "हें नांव तर तुम्ही स्वतःच मला दिलं आहे."

"तो नुसता मी व्यवहार केला."

"पण मी तो व्यवहार मानला नाहीं. संस्कार मानला. संस्कार झालाच मुळीं. त्या दिवसापासून आपण नवराबायको झालों."

"पण मी सांगतो ना," महेश्वरपंत एकाएकीं आवाज चढवून म्हणाले, "कीं तूं माझी कोणी नाहींस. आणि मी तुझा कोणी नाहीं."

"मग तुम्हीं माझ्याशीं लग्न कशाला केलंत?"

"हुंड्यासाठीं! अशी दचकूं नकोस. केव्हांतरी तुला सांगावंच लागणार. तर तें आतांच सांगतो. तुझ्या बापानं दहा हजार रुपये दिले ते मिळवण्यासाठीं मी तुझ्याशीं लग्न केलं. नाहींतर अशा ध्यानासाठीं बोहल्यावर कोण उभं राहिलं असतं?"

"हे एवढे पैसे तुम्हांला कशाला हवे होते?"

महेश्वरपंत प्रथम चाचरले. पण लगेच निश्चयानें म्हणाले, "हवे होते मला कर्ज फेडायला. कर्ज! बापाचं कर्ज! तो बोजा माझ्या डोक्यावर असह्य झाला होता. तो फेडण्याचा हा एक सोपा उपाय वाटला म्हणून मी हुंडा घेतला. आणि त्यासाठीं तुझ्याशीं लग्न केलं. समजलं?"

तारा आणखी थोडी पुढें झाली आणि म्हणाली, "समजलं. पण यांत वाईट काय आहे? यांत एवढं राग येण्यासारखं काय आहे? तुमच्या वडिलांचं कर्ज तुम्ही फेडलंत हें चांगलंच झालं. तुमचं कर्ज तें माझंच कर्ज होतं. माझा पैसा हा तुमचाच पैसा होता. तुमचा आणि माझा पैसा काय वेगळा थोडाच आहे?"

"पैसा वेगळा नाहीं." महेश्वरपंत छद्मीपणानें म्हणाले, "पैसा वेगळा आणि निराळा काय असणार आहे? पैसा इथून तिथून सारखाच असतो. पण निराळी आहेस ती तूं. तूं निराळी आणि मी निराळा."

"याचा अर्थ?" तारानें धीर खचून विचारलें.

"याचा अर्थ तुझा मार्ग निराळा आणि माझा मार्ग निराळा."

इतका वेळ अवसानानें बोलणारी तारा एकदम भेलकांडून गेली. तिची कंबरच खचली. पण त्याहि अवस्थेंत तिला आपला लग्नसोहाळा






अनुक्रमणिका

आठवला. त्या मंत्राक्षता, तो होम, ती सप्तपदी...मनुष्याचें जगच्या-जग पालटून टाकण्याचें सामर्थ्य ज्या मंत्रांत होतें तो मंत्र...

ताराच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा सुरू झाल्या. साऱ्या शरीरभर आणि मनभर एक मोठें थोरलें वादळच सुरू झालें कीं त्याचा झंझावात तिला सहन होईना. तीरासारखी ती धांवली. आणि तिनें महेश्वरपंतांचें पाय धरले. ओक्साबोक्शी रडत तारा म्हणाली, "मला पदरांत घ्या. माझं कांहीं चुकलं तर मला सांभाळून घ्या. तुमची शपथ तुमच्या मनाविरुद्ध मी कांहींसुद्धां करणार नाहीं. जें तुम्हांला आवडेल...."

"मला हेंच आवडेल." एकाच धक्क्यानें ताराला बाजूला ढकलून आपले पाय सोडवून घेत महेश्वरपंत ओरडून म्हणाले, "तूं माझ्या दृष्टीसमोरसुद्धां येत जाऊं नकोस हेंच मला आवडेल. आणि कृपाकरून रडण्यानं हें नाटक..."

"नाटक ?" तारा पुन्हां जीव गुदमरून म्हणाली.

"हो नाटक! हेंहि नाटक आणि तेंहि नाटक. तीन दिवसांपूर्वी साऱ्या लोकांच्या साक्षीनं जें झालं तें केवळ नाटक होतं."

"साक्ष लोकांची नाहीं. माझ्या अंतःकरणाची आहे."

"तें अंतःकरण चुलींत घाल. ती साक्ष जाळून टाक. आणि... आणि...एकदांचं इथून काळं कर."

महेश्वरपंतांनीं भराभर कोट चढवला. भराभर बूट घातले. आणि पहातां पहातां ते धाडधाड जिना उतरून गेले. तारा नुसती पहात राहिली. कसला तरी विध्वंस झाल्याचें दृश्य समोर तरळूं लागलें. मघां महेश्वरपंतांनीं खस्सदिशीं ओढून घेतलेले कपडे तिथेंच पडले होते. त्या कपड्यांप्रमाणेंच घरभर साऱ्या वस्तू विखरून पडल्या आहेत असें तिला वाटूं लागलें. घराची कळाच बदलून गेली. मन जसें मोडून गेलें. आपलें जगच मुळीं उध्वस्त झालें आहे हें तिला समजून चुकले.

तरी एखाद्या मुलानें मोडलेली खेळणी रडत रडत गोळा करावीत, मोडलेलें खेळणें जोडून पहावें, तसे ती कपडे गोळा करूं लागली. ते ओढून घेतलेले आणि फेकून दिलेले महेश्वरपंतांचें कपडेच तिनें आपल्या छातीशीं धरलें. आणि तिच्या डोळ्यांतले अश्रुहि त्यावरच सांडत राहिले. तारा रडत होती आणि आपल्या उध्वस्त संसाराकडे पहात पहात म्हणत होती कीं "हें सारं मला जोडून घेतलं पाहिजे. फाटलेलं शिवलं पाहिजे. हरवलेलं शोधलं पाहिजे. आणि सांपडलेलं जपलं पाहिजे. जसं त्यांना हवं असेल, जसं त्यांना आवडत असेल...

तारानें पुन्हां एकदां कंबर बांधून स्वयंपाक केला. पुन्हां एकदां सारें घर आरशासारखें लख्ख करून टाकलें. मग तिनें स्वतःची वेणी घातली. तोंड धुतलें. नवें पातळ नेसली आणि महेश्वरपंतांची वाट पहांत बसली.

रात्रीं नऊ वाजले. दहा वाजले. अकरा वाजले. ताराचा जीव खालींवर होऊं लागला. घरचा मनुष्य निदान घरीं तरी येऊं दे असें तिला वाटूं लागले. पण एक वाजून गेल्यावर महेश्वरपंत घरीं आले. ते आले तेच मुळीं झोपेनें घेरलेले आले. आल्याबरोबर त्यांनी पलंगावर अंग टाकलें.

तारा भीत भीत उसने अवसान घेऊन पुन्हां एकदां खोलीच्या दारांत येऊन उभी राहिली. "जेवायचं तयार आहे. वाढूं ना ?"

खाडदिशी गादीवर उठून बसत महेश्वरपंत खेसकले, "मी संध्याकाळींच तुला एकदां सांगून टाकलं आहे कीं मला तुझ्या हातचं जेवण नको."

"पण तुम्ही उपाशी..."

"मी एवढा मूर्ख मनुष्य नाहीं. म्हणे उपाशी!" भयंकरपणें हंसत महेश्वरपंत म्हणाले.

"मग जेवण कुठें झालं ?"

"झालं मसणांत! तुला काय करायच्या आहेत पंचायती ?"

"वाटलं, कीं चौकशी करावी."

"चौकशा नको आहेत मला."

उंबऱ्यांतून आंत येत तारा म्हणाली, "एवढं काय मनाला लावून घेतां? पुष्कळांचे बाप कर्ज करून ठेवतात आणि ते मुलांना फेडावं लागतं. आणखी कर्ज असलं तर आपण फेडून टाकूं."

"कसं फेडून टाकूं ?"

"माझ्या अंगावर हे दागिने आहेत ते घ्या. आपल्याजवळ शिल्लक असली तर ती देऊन टाका. तुम्ही म्हणाल तर मी नोकरी सुद्धां करीन. पण कुणाचं कर्ज नको आपल्याला."

महेश्वरपंत क्षणमात्र गप्प बसले. तें पाहून तारा पुन्हां म्हणाली, "खरोखर सांगते, हें दागिने नकोत मला. डोक्यावर कर्ज ठेवून दागिने कशाला घालायचे ?"

विचारमग्न होत महेश्वरपंत म्हणाले, "काय काय देशील ?"

"तुम्ही म्हणाल ते. तुम्हाला हवे असतील ते. सगळे हवे असले तर सगळेसुद्धां!" बोलत बोलत तारा महेश्वरपंतांच्या बरीच जवळ येऊन उभी राहिली.

"मग आण तर," महेश्वरपंत हात पुढें करीत म्हणाले, "सध्यां ह्या तुझ्या बांगड्या, पाटल्या दे. आणि गळ्यांतला गोफ दे."

तारानें हात पुढें केला. आणि महेश्वरपंतांनी तिच्या सोन्याच्या बांगड्या काढल्या. पाटल्या काढून घेतल्या. तारानें मान पुढें केली. तेव्हां महेश्वरपंतानी गोफहि काढून घेतला. आपल्या सुंदर, मजबूत हातांनी महेश्वरपंतानी ताराचे दागिने काढून घेतले.

पण ताराला त्याचे कांहीं वाटलें नाहीं. दागिन्यांचें महत्व नव्हतेंच मुळीं. महत्व होतें नवऱ्याचें! आणि त्या नवऱ्यानें कोणत्या कां निमित्तानें असेना, तारांच्या हाताला हात लावला होता. गळ्याला हात लावला होता. त्या स्पर्शसुखानेंच तारा उल्हसित झाली. महेश्वरपंतानी ते दागिने हातावर तोलून धरले. जणुं मनांतल्या मनांत वजन केले. आणि कपाट उघडून ठेऊन दिले. कपाटाच्या किल्ल्या स्वतःच्या उशाला ठेऊन दिल्या. मग किंचित काळ ओठ दुडपून त्यांनी विचार केला. आणि ओठाच्या कोपऱ्यांत हंसून ते म्हणाले, "चल वाढ मला जेवायला."

ताराचें हृदय एकदम मोठें झालें. आनंदातिशयानें तिनें आपला डावा हात उजव्या हातानें दाबला. भराभर पावलें उचलत ती

(पान ३८ वर पुढें चालू)



'कुत्री'

# टोपणनांवें

*जोपर्यंत माणसांना नांवें दिलीं जातात, तोपर्यंत त्यांना टोपण नांवेंहीं दिलीं जाणारच ! आणि हीं टोपणनांवें मूळ नांवांना मूठमातीं देऊन त्यांना अगदीं "होतीं कीं नव्हतीं" देखील करून टाकणार !*

— पु. भा. भावे

माझ्या एका मित्राचं नांव आहे पांडुरंग गणेश उपाख्य पी. जी. देव. आतां ह्या नांवांत कुठं कांहीं कमी आहे का ? मुळींच नाहीं. चांगलं अथपासून इतिपर्यंत देवाच्या नांवानं रंगलेलं नांव आहे. पहिलं नांव देवाचं, दुसरं नांव देवाचं, आणि आडनांव देखील त्या परात्पर परमेश्वराचंच. तेव्हां आतां त्या पांडुरंग गणेश देवाला लोकांनी सरळ पांडुरंग गणेश देवच कां म्हणूं नये ! येवढं मोठं नांव झेपत नसेल तर त्यांना त्यांनी नुसतं पांडुरंगपंत कां म्हणूं नये ? निदान त्याला पांडू, गेला बाजार पांड्या म्हणायला तर कांहीं चिंता नाहीं ना ? पण माणसं एकंदरीत अशीं वांकडीं आणि विघ्नसंतोषी कीं तीं कांहीं पी. जी. देवला पी. जी. देव म्हणत नाहींत. तीं त्याला "**पाजी**" **देव** म्हणून संबोधतात. "**पांडुरंगपंत देव** कुठें राहतात ?" म्हणून तुम्ही त्याच्या आळींत चौकशी करा. प्रत्येक जण बावळटासारखा चेहरा करील. कुणाला कांहीं कळणारच नाहीं. तेच "**पाजी देव** कुठें असतात ?" असं तुम्ही विचारून पहा. क्षणार्धात त्यांच्या डोक्यांत उजेड पडेल. त्यांचे जबडे संवादतील आणि तुमचं काम होईल.

कारण त्यांच्या गल्लींत आणि साऱ्या गांवांत पी. जी. देव हा 'पाजी' देव म्हणूनच ओळखला जातो. पांडुरंगाच्या पवित्र नांवावर लोकांनी "पाजी" ह्या टोपणनांवाची टोपी चढवून ठेवली आहे. लोकांच्या ह्या कुटाळ कर्तृत्वासमोर पाळण्यांतल्या पांडुरंगाची सारी पुण्याई फिकी पडली आहे. लोकांनीं स्वतःला "पाजी" म्हणून संबोधावें ही गोष्ट पांडुरंग गणेश देवाला मुळींच आवडत नाहीं. पण बहुसंख्यात्मक लोकनिर्णयासमोर बापडा पांडुरंग तरी काय करणार ? एका फटक्यांत देवाची व माणसाची पूजा बांधणारे "पाजी" हें टोपणनांव त्यानें मुकाट पचनी पाडलें आहे. इतकें कीं "पाजी" ऐवजीं तुम्ही त्याला "पी. जी." म्हणून हांक दिलीत तर तुम्हांला त्याचेकडून उत्तर मिळणें दुरापास्त जाईल, इतकी हा देवमाणूस आतां स्वतःची ओळख विसरला आहे. आणि हा भला माणूस जन्मतः "पी. जी." असतांना जन्माचा "पाजी" ठरला, ह्याला कारण केवळ जनताजनार्दनाची भिकार कोट्यांची हौस.

जातांजातां एखाद्याची टिंगल करण्याच्या ह्या वृत्तींतूनच माझ्या दुसऱ्या एका मित्राला त्याच्या परिचितानीं "चंपू" ह्या टोपणनांवाची साडीचोळी बहाल केली आहे. दैववशात जमलेल्या नामाक्षरांतूनच ह्या टोपणनांवाचा जन्म झाला आहे. चं(द्रकांत) पु(रुषोत्तम) पारखी ह्या मिशाळ नांवावर शस्त्रक्रिया करून आंबटशोकी मंडळींनीं त्याची चंपू बनवून टाकली.



'पाजी' देव

परंतु टोपणनांवाची आंगडी टोपडी बनविणारी चतुर मंडळी नेहमींच कांहीं नामाक्षरांच्या अपघाती घडणीवर अवलंबून रहात नाहींत. पुष्कळदां त्यानीं केलेल्या नामकरणाला एखाद्या स्वभावविशेषाचा भरभक्कम पाया असतो. सूक्ष्म मनोविश्लेषणाचा परिचयहि कांहीं टोपणनांवें करून देत असतात. आणखी कांहीं टोपणनांवें एखाद्या ढोबळ शारीरिक व्यंगाचे, लकबीचे, गुणाचे (अथवा अवगुणाचे) शब्दचित्र काढीत असतात.

बी. ए. च्या वर्गात माझ्याबरोबर एक विद्यार्थी होता. त्याचें नांव होतें धोंडू भुस्कुटे. कुठलीहि पोरगी पाहिली कीं हा दगड आपला प्रेमानें पाझरूं लागायचा. महिन्यांतून निदान आठदहा पोरींवर तरी हा फिदा होऊन जायचा. आणि दरवेळीं हा कुठल्या ना कुठल्या पोरीच्या नांवानें उसासे सोडीत बसायचा. चालत्या पोरीवर पाहतां पाहतां फिदा होऊन जाण्याचा त्या ब्राह्मणपुत्राचा अद्भुत स्वभाव पाहतांच मुलांनीं त्याच्या डोक्यावर एका यावनी नांवाची टोपी ठेवून दिली. मुलें त्याला म्हणूं लागलीं "फिदा हुसेन !" आणि ह्या त्याच्या नव्या नांवाने त्याच्या मूळ नांवाचे कबरस्तान बांधले. आणि असे होणें अगदीं साहजीकच होतें. आपल्या गुणी बाळाच्या भावी कर्तृत्वाचा किंचितहि कयास नसलेल्या बाळबोध आई-बापानीं त्याला "धोंडू" हें

वेडेबगडे नांव देऊन टाकले. धोंडूच्या रंगेल स्वभावाशीं अगदीं विसंगत व त्याच्या वृत्तीचा मुळींच थांगपत्ता न लागूं देणारे त्याचे ते जन्मनांव होतें. ते नांव फसवें होतें—दिशाभूल करणारें होतें. परंतु धोंडूच्या आईवडिलांची चूक त्याच्या सोबत्यांनीं सुधारली. "धोंडू मुस्कुटे" चा त्यांनीं "फिदा हुसेन" बनवून टाकला. धोंडूच्या स्वभावांतील मर्मावर बोट ठेवणारे हे नवें नांव होतें. "पी. जी. देव" चा "पाजी देव" बनविणें हा अगदींच पाणचट-पणा. परंतु "धोंडूचा" "फिदा हुसेन" बनविण्यांत मात्र फार मार्मिकता होती. चांगल्या प्रतीचे विडंबन, व चांगल्या प्रकारची विनोदबुद्धी होती. ह्या नांवामुळें धोंडूची थट्टा होतच असली तर त्या थट्टेला तो पात्र होता. त्या उपरोधिक थट्टे-मुळें धोंडू कधींकाळीं सुधारण्याचाहि संभव उत्पन्न झाला होता. परंतु आज मात्र धोंडूला "फिदा हुसेन" हे नांव एखाद्या पदवीसारखें प्रिय वाटतें. (असा तो निलाजरा आहे.) धोंडू ह्या दगडी नांवापेक्षां "फिदा हुसेन" ह्या म्लेंच्छ नांवावरच तो फार फिदा आहे. ह्या अविंध उपाधीमुळें बुरख्यांतील एखादी पाकसुरत मस्तानीहि आपल्यावर आशक होईल अशी चोरटी आशाहि धोंडू बाळगून आहे. (परमेश्वर त्याला यश देवो!) एकूण काय, कीं उभयपक्ष ह्या टोपण नांवावर प्रसन्न आहेत.



'फिदा' हुसेन

परंतु सगळींच टोपण नांवें अशीं सगळ्यांना समाधान देणारी असत नाहींत. परशुराम-पंतांचें टोपणनांव "भाऊ" असावें किंवा नारायणरावांचें सुटसुटीत "नाना" व्हावेत हे सर्वमान्य निरुपद्रवी संकेत झाले.

कोळसे विकणाऱ्या रामभाऊ गोऱ्यांना लोक "कोळसेवाले गोरे" किंवा "कोळसे-वाले रामभाऊ" किंवा नुसतेच "कोळसे-वाले" म्हणून संबोधूं लागतात, तेव्हां कुणाच्याच मनांत कांहीं काळेबेरें येत नाहीं. ज्या जादूनें "गोखल्यांचे" "रास्ते" होतात त्याच जादूनें गोऱ्यांचे कोळसेवाले होतात. कोळशाच्या धंदेवाईक दिगाऱ्यांत गाडल्या गेलेल्या गोऱ्यांना कोळसेवाले म्हणून संबोधण्यांत त्यांच्या तोंडाला काळें फासण्याचा कुणाचाच उद्देश नसतो. येथें मूळ उपनांवावर धंदा मात करून जातो, व धंद्यापोटीं जन्म-लेलें टोपणनांव त्याच धंद्याचे विज्ञापन करीत सुटतें, इतकेंच काय तें घडतें. "सोडावॉटर-वाला" "दारूवाला" आदि तमाम तत्सम टोपणनांवांची अशीच गोष्ट आहे.

पण सारीच टोपणनांवें इतकी साळसूद नसतात. विशेषतः माणसाच्या एखाद्या खोडीचे विडंबन करणारी टोपणनांवें तर विंचवाच्या नांगीसारखा डंख मारतात. उदाहरणार्थ "कुत्री" हें टोपणनांव पहा. आमच्या गांवांत रहाणाऱ्या एका रंगेल विधवेनें ह्या टोपण नांवाची कमाई केलेली आहे. आमच्या 'फिदा हुसेन' पेक्षांहि हिचा प्रेमविकार विकोपाला गेलेला आहे. ही बाई घरंदाज, श्रीमंत, आणि सुशिक्षीत आहे. समाजसेवेचाहि हिला नाद आहे. पण समाजसेवा करण्याची हिची पद्धत कांहीं वेगळीच आहे. पाळलेल्या पुरुषांची रांग आपल्या मागें धांवती ठेवण्यांतच ह्या बाईला धन्यता वाटते. हे पुरुष परस्परांवर थुंकतात, एकमेकांना दांत दाखवितात, आणि ह्या विदुषिसमोर पुच्छ हलवीत असतात. हा सारा सांघिक खेळ ह्या परोपकारी पुरंध्रीला मोठा मनोरंजक वाटतो. आपल्या सामु-दायिक प्रेमाचें प्रदर्शन ती सुंदरी सतत करीत असते. आणि म्हणून निर्भीड लोकमत तिला उंच स्वरांत हांक मारतं "कुत्री!"

आपल्या वरिष्ठांची किळसवाणी चाटु-स्तुती करीत बसणारे दुसरे एक गृहस्थ माझ्या परिचयाचे आहेत. ते गृहस्थ "**पोलसन**" ह्या नांवानें प्रख्यात आहेत. अर्थात् ते पोलसन लोण्याचे विक्रेते अथवा भोक्ते नाहींत. ह्या उपाधीचा अलंकार त्यांनीं वेगळ्याच गुणाच्या बळावर प्राप्त करून घेतला आहे.

काणे नांवाच्या माझ्या एका मित्राला लोक "**मसणे**" म्हणून ओळखतात. ह्या अपशकुनी पदवीची व्याद बिचाऱ्या काणेच्या मागें उगाचच लागली आहे. त्याचें घर एका मसणवटीजवळ आहे, इतकाच काय तो त्या बापड्याचा अपराध आहे. परंतु मसणवटीजवळ घर बांधण्याच्या निर्णय–प्रमादासाठीं काणे आज भारी शिक्षा भोगीत आहे. मसणाचा शेजार पत्करल्यामुळें काणेचें मूळ उपनांव अक्षरशः मसणांत गेलें आहे. एरवी "मसणे" हे सुतकी नांव मिळावें असा एकहि दुर्गुण काणेंत नाहीं.



'घंटी' हेमलता जोशी

मसणेवरून आठवण झाली. माझ्या दुसऱ्या एका मित्रानें मसणाशीं फार जवळचा संबंध सांगणाऱ्या एका टोपणनांवाची मिळकत केली आहे. लोक त्याला "मुडदेफरास" म्हणतात. केवळ परोपकारापायीं ही भेसूर पदवी त्याच्या पदरांत पडली. कुणाचीहि "गच्छन्ती" झाली म्हणजे हा आपला तिथें खांदा द्यायला उपस्थित असतो. ह्या त्याच्या सेवावृत्तीविषयीं त्यानें "मुडदेफरास" ह्या टोपण नांवाची जोड केली. गांवठी विनोदबुद्धींतून पण प्रामाणिक कौतुकांतून उत्पन्न झालेलें हें टोपणनांव अर्थात् मोठ्या आदरानें वापरलें व स्वीकारलें जाते.

तरुण पोरीबाळींना वखवखलेल्या उत्साहानें फुकट गाणें शिकविणारा एक अर्ध्या वयाचा आधुनिक "बुवा" मी पाहिला आहे. कसले ना कसले निमित्त काढून पोरींच्या पाठीवर हा सतत थापा मारीत असतो. म्हणून लोक ह्या आंबटशोकी माणसाला म्हणतात "पाठीराखा!" (कुणी कुणी "थापेबाज" हा पाठभेदहि त्याच्या विषयांत वापरतात.)

एका काटकीसारख्या वाळलेल्या आणि कुरूप म्हाताऱ्याचा उल्लेख मी "चुंबक" ह्या टोपणनांवानें होतांना ऐकला. ते गोड नांव त्या म्हाताऱ्याच्या रूपाशीं मला फारच विसंगत वाटलें. ह्या विषयांत मी स्पष्टिकरण मागितलें तेव्हां मला असें कळलें कीं तो कांहीं कुणी रंगेल म्हातारा नव्हता. एखाद्या

रंभेच्या चेहऱ्यापेक्षांहि एका भोकाच्या पैशावर अधिक लुब्ध होणारा तो कवडि-चुंबक होता. "चुंबक" हे एका नीरस स्वभाववर्णनपर विशेषणाचें रसाळ लघुरूप होते इतकेंच. कांहीं टोपणनांवें अशी स्वभाव-वर्णनपर असतात, तशी कांहीं टोपणनांवें शरीरवर्णनपर असतात. मगनलाल मारवा-



अस्वल जाधव

ड्याला लोक टुंड्या मारवाडी म्हणतात. कारण तो एका हातानें टुंडा आहे. देशपांडे वकीलाला लोक लंगड्या वकील म्हणतात. कारण तो बुद्धीनें अथवा पैशानें नव्हे तर पायानें लंगडा आहे. कुणा एका शिक्षिकेला लोक "म्हैस" ह्या टोपण नांवानें ओळखतात. ह्याचें कारण इतकेंच कीं ती काळीकुट्ट व खूप लठ्ठ आहे. हेमलता जोशी "घंटी" ह्या नांवानें प्रसिद्ध पावली आहे, कारण तिचा स्वर एखाद्या घंटेसारखा आहे. गणपतराव जाधवाला तर त्याच्या टोपण नांवानें एका अक्राळविक्राळ पशुयोनींत ढकलून दिले आहे. हा गणपतराव आपल्या गांवांत "अस्वल" म्हणून ओळ-खला जातो. कुठलाहि पाशवी गुण अंगीं नसतां, अंगावर केवळ दाट केसांचे रान आहे येवढ्याचसाठीं गांवकऱ्यांनीं गणपतरावाचे "**अस्वल**" बनवून सोडले आहे.

आमच्या महाविद्यालयांत एकेकाळीं एक "**देवीदासपंत**" होते. हे देवीदासपंत साडीचोळी घालीत असत. ते वेणींत फुलें व हातांत बांगड्या घालीत. त्यांनीं तसें करणें साहजीकच होतें. कारण ते पुरुष नव्हते तर स्त्री होते. आणि तरीहि महाविद्यालयांतील मुलांनीं त्यांचे "देवीदासपंत" असें नामकरण करून टाकले होतें. आणि त्या नामकरणाला आधार होता त्या मुलीच्या चेहऱ्यावरील देवीच्या शेंकडो वणांचा !

दुसऱ्या एका विद्यार्थ्याचें टोपणनांव "बटाट्या" असें होतें. त्या मुलाचें आडनांव गोळे असें होतें आणि शरीरानें तो गोलगोल आणि ठेंगणा होता. म्हणून बाळकृष्ण गोळेचा "बटाट्या गोळे" झाला. आणखी एकाचें टोपणनांव 'ग्रेटा गार्बो' होतें. ग्रेटा गार्बो त्याला फार आवडत असे इतकेंच त्याला हें नांव मिळण्याचें कारण. इंग्लीश दुसरींत असतांना आमच्या एका वर्गबंधूला आम्हीं "Do-Die-Do" म्हणून हाका मारीत असूं. हा शुद्ध भाषांतराचा प्रकार होता. कारण Do-Die-Do चे आडनांव कर-मर-कर असें होतें. आणि नुकत्याच हातीं सांपड-लेल्या इंग्लीश भाषेचे हत्यार आम्ही बिचाऱ्या करमरकरवर चालविलें होतें. हें भाषांतरात्मक टोपण नांव म्हणजे आम्हांला आमच्या इंग्लीशवरील प्रभुत्वाची व विनोदबुद्धीची परिसीमा वाटत होती.

वय वाढल्यावर एकमेकांना टोपणनांवें देतांना अथवा परस्परांना टोपणनांवानें हांका मारताना माणसाला थोडा संकोच वाटतो. परंतु विद्यार्थी दशेंत टोपणनांवें सर्रास दिली व वापरली जातात.

'प्रिझनर ऑफ झेंडा' नांवाची एक कादं-बरी कित्येक वर्षे मध्यप्रदेशांतील प्रशाळांतून चालू होती. त्यांतील नायिकेचें नांव प्रिन्सेस फ्लाविया होतें. नायकाचें नांव रूडॉल्फ रॅसेंडिल होतें व ब्लॅक मायकेल आणि रूपर्ट ऑफ हेण्टझॉ हे त्या पुस्तकांतील दोन खल पुरुष होते. वर्गांतील काळ्या व राकट मुलाला ब्लॅक मायकेल म्हणायचें, धाडसी आणि धूर्त मुलाला 'रूपर्ट' म्हणायचे, वायकी शूर आणि उमद्या मुलाला "रूडॉल्फ" म्हणावयाचे व वायकी आणि देखण्या मुलाला "प्रिन्सेस फ्लाविया" म्हणावयाचें, हा प्रकार (त्या काळच्या) मध्य प्रदेशांतील प्रत्येक शाळेंतून चालू होता.

विद्यार्थी केवळ एकमेकांना टोपण नांवें देऊन थांबत नसत तर ते आपल्या शिक्षकां-वरहि ह्या विद्येचे प्रयोग करीत. आमच्या पंडीत मास्तरांना दर दोनचार वाक्यागणिक एकदां "Stupid" म्हणून शिवी द्यायची संवय होती. म्हणून आम्ही त्यांना "स्टुपिड पंडीत" ही त्यांचें आडनांव बाद करणारी पदवी दिली व त्यांच्या ऋणांतून मुक्त झालों. देसाई मास्तरांना खांद्यावर आडवी काठी टाकून चालण्याची संवय होती म्हणून ते "**धनगर**" ह्या नांवानें ओळखले जात. प्रा. कुळकर्णी "दाते" ह्या टोपण नांवानें प्रसिद्ध होते, कारण त्यांचे दांत पुढें होते-आणि प्रा. हवालदार "कनमडी हवालदार" बनले. कारण कनमडी हे त्या कानडी माण-साचें मूळ गांव होतें. देवल मास्तरांना दोन बायका होत्या. आणि त्यांच्या दोन्ही बायका फार तोंडाळ होत्या म्हणून त्यांचे नांव पडलें होतें "**दुतोंडी देवल**" (कुणी कुणी इंग्लिशचे चाहते त्यांना Two Mouth देवल किंवा डबल बॅरल देवल असेंहि म्हणत.) बिचाऱ्या "दुतोंडी देवलांचा" दोन तोंडाशीं संबंध आला होता, इतकेंच. एरवीं ते वचनाचे धड (आणि गोड सुद्धां) होते. ह्यावरून कांहीं टोपणनांवें किती दूरान्व-याचीं व गूढ असतात हें ध्यानांत येईल.

माचवे नांवाच्या एका हलकट माणसाला "कचरा पेटी" हें टोपण नांव प्राप्त झालें होतें. हा माचवे एखाद्या पोत्यासारखा लठ्ठ होता आणि तो फार ढोंगी देखील होता. म्हणून त्याचें "पोतेबुवा" हें दुसरें एक नांव प्रचलित होतें. ज्याच्या सोईला जें नांव येईल तें त्यानें द्यावयाचें. "कचरा पेटी" ह्या नांवानें माचवेचा आकार आणि गुण दोन्हीं व्यक्त होत. "पोतेबुवा" ह्या मवाळ टोपण नांवाचा मुख्य भर मात्र माचवेच्या फुगलेल्या देहावर होता.

कुठल्या तरी व्यंगावर, खोडीवर, गुणावर अथवा अवगुणावर भर देणें हा अनेक टोपण नांवाचा उद्देश असतो. मुलाला जन्म देण्याचे व त्याला नांव ठेवण्याचें काम आईबाप करीत असतात. एखादा नग आकारास आणि त्यामुळेंच त्यावर नांवाचा शिक्का मारण्याचा अधिकारहि आईबापांना प्राप्त होत असतो. परंतु बारशाचे वेळीं ह्या नगाचे गुणावगुणा-विषयीं स्वतः तो नग व त्याचे आईबापहि अज्ञानावस्थेंत असतात. मुलांच्या नामकरणांत साधारणतः आईबापांची हौस आणि आवड प्रकट होते इतकेंच. त्या नांवाचा त्या मुलाच्या



दुतोंडे देवल



### गणगोत —

सान्या इंद्रियांची माया
आज गोठली प्राणांत
पंखाविण चढायाचा
तुझ्या आभाळाचा घाट
आज दुःखाला लागली
भोळ्या ऊर्मिलेची ठेंच
भग्न शब्दांच्या ओठांत
रित्या आशयाला घोट !
आज तुझ्याच हातांनीं
माझें तुटायाचें पाणी
सखे अभंगाच्यासाठीं
नको रडूं इंद्रायणी !
आतां येऊं दे मरण
देहीं पडतिक हात
बहु दुरून आले रे
माझें सारें गणगोत.

—माणिक गोडघाटे

गुणाशीं संबंध असेलच असें नाहीं. पुष्कळदां पुस्तकांच्या पोटांतून दारूची बाटली निघावी, तसा ह्या नामकरणांचा प्रकार होतो. पुस्तकाचें नांव असतें "दारूबंदी" व पुस्तकांतून निघते "दारू". माणसाच्या स्वभावगुणांचेंहि असेंच होतें. मुलाचें नांव ठेवलें जातें तेव्हां तें विचारें तान्हुलें अगदींच...अपंग व अडाणी असतें. पण हळूहळू हें तान्हुलें वाढूं लागतें व आपले गुण पाघळूं लागतें. अवतेभवते त्याच्या ह्या गुणांची परीक्षा करतात व त्याचें नव्यानें बारसें करतात. मूळ नांव त्यांना पटलेलें नसतें, पचलेलें नसतें, अथवा रुचलेलें नसतें.

टीका, टिंगल, टवाळी, स्वभावदर्शन, व्यंगदर्शन, शरीरदर्शन, संकोचीकरण ह्यांसारख्या अनेक दृश्यांतून टोपण नांवाचीं नाणीं पाडलीं जातात. "बी. बी." किंवा "डबल बी" हें नांव बाळकृष्ण बोडसाला कां मिळालें असेल ह्याचा पत्ता सहज लावतां येतो. "वसंतराव दिक्षीत" हे "गांवमामा" किंवा नुसतेच "मामा" म्हणून कां ओळखले जात असतील, ह्याचेंहि उत्तर शोधतां येतें.

गोपाळ ढेरेला त्याची मित्रमंडळी "तेनसिंग" म्हणून ओळखतात. वस्तुतः ढेरे हा सुखवस्तू माणूस. डोंगर चढणारांपैकीं तो नव्हे. (डोंगर त्यानें चित्रांतच काय तो पाहिला असेल.) पण तेनसिंग ज्या चिकाटीनें "गौरी शंकरा"च्या मागें लागला, त्या चिकाटीनें ढेरे "गौरी"च्या (अर्थात् गौरबाला, पहिला हिंदी बोलपट) मागें लागतो. त्यांना भेट-वस्तू देतो–त्यांची ओळख करून घेतो–त्यासाठीं वाटेल तितके जिने चढतो, कष्ट घेतो, चिकाटी दाखवितो. सर्व प्रकारचे जिने ढेरे चढतो. कसूर करीत नाहीं. आणि शेवटीं जिंकतो. म्हणून त्याला म्हणतात "तेनसिंग". ढेरेला तेनसिंगवरून मिळालेलें हें टोपणनांव तेनसिंगच्या कर्तृत्वाला फारसें शोभादायक नाहीं. पण त्या टोपणनांवाची वाकडी तिकडी कां होईना, पण कांहीं व्युत्पत्ती लावतां येते. तेनसिंग डोंगरावर चढाई करीत होता–ढेरे जिन्यावर चढाई करतो असा ह्या बिरुदाचा कांहीं अर्थ लावतां येतो. पण कांहीं टोपणनांवें अशीं आहेत कीं तीं व्युत्पत्तीशास्त्राच्या साफ तोंडांत मारतात. लखू देशमुखाला लोक "**झांबऱ्या**" देशमुख कां म्हणतात हें कुणालाच कळलेलं नाहीं. हें नांव त्याला कुणी दिलें, एखाद्या नवकवीला शोभेल असा हा मेंदू कुणाचा, त्याचाहि कांहीं थांगपत्ता लागत नाहीं. फार फार प्राचीनकाळापासून "लखू"ला सारीं माणसें "झांबऱ्या" म्हणूनच संबोधीत आलीं इतकेंच लोकांना ठाऊक असतें! आणि म्हणून तेहि बेंबीच्या देठापासून ओरडून लखूला हांक देतात. "ए झांबऱ्या?" आणि तोहि बापडा ह्या चमत्कारीक नांवाला मुकाट्यानें "ओ" देतो. "झांबऱ्या" ह्या नांवाचा शिक्का आपणावर प्रथम कोणी व कां मारला हें प्रत्यक्ष लखूलाहि ठाऊक नाहीं. जनतावादाच्या ह्या काळांत लोकमतासमोर आपण मुकाट्यानें मान तुकविली पाहिजे. इतकेंच त्या बिचाऱ्याला ठाऊक आहे.

टोपणनांवाचा आदिअंत शोधणें हें कामच मोठें कठीण आहे. वेरूळ अजंठ्याच्या अज्ञात कलाकाराप्रमाणें कोणातरी अज्ञात कलाकारानें (अथवा कलाकारांनीं) हे कुशल कर्म कोणी तरी करून ठेवलेलें असतें. ह्या कलाकृती कधीं वैयक्तिक असतात तर कधीं सामुदायिक असतात. वैयक्तिक बुद्धीची चमक व समूहाचा बथ्थडपणा ह्या दोहोंचा साक्षात्कार टोपण नांवांतून घडत असतो. पण स्वतःचें नांव रहावें, अशी मुळीं ह्या निरिच्छ माणसाची इच्छाच नसते. दुसऱ्याला नांव ठेवणें, हेंच त्याचें जीवनकार्य असतें. म्हणून टोपण नांव ठेवणारांचें नांवगांव नेहमीं अज्ञातच रहातें. ह्या दृष्टीनें वेदाप्रमाणेंच टोपणनांवेंहि "अपौरुषेय" वाङ्मयांत जमा होण्यासारखीं आहेत. परंतु हे वाङ्मय चिरंतर स्वरूपाचें आहे ह्यांत मात्र शंका नाहीं. कारण जोंपर्यंत माणसांना नांवें दिलीं जातात. तोंपर्यंत त्यांना टोपण नांवेंहि दिलीं जाणारच, आणि हीं टोपण नांवें मूळ नांवाना मूठमाती देऊन त्यांना अगदीं "होती कीं नव्हती" देखील करून टाकणार.






अनुक्रमणिका

# जत्रेंतील चित्रें : २

ग. दि. माडगूळकर

स्वातंत्र्य लाभानंतर आपल्या देशांत 'राजा' उरला नाहीं. राजघराण्यांच्या गोष्टी इथून पुढच्या काळांतहि चालू राहतील पण राजा प्रत्यक्ष पाहण्याची संधी पुढच्या पिढ्यांना क्वचितच मिळेल.

# औंधाचा राजा



मी राजा पाहिला होता. पदरीं राजकवि ठेवण्याइतका बडेजाव त्या राजानें कधीं केला नाहीं, पण यदाकदाचित् जर मी त्याचा राजकवि झालों असतो तर 'साक्षात् मनुरिव स्वयम्' असें त्याचें वर्णन करतांना मी थबकलों नसतों. त्या राजाला मी प्रथम पाहिलें, तेव्हां माझें वय दहा अकरा वर्षांचें होतें. राजा म्हातारपणाच्या पायऱ्या चढूं लागला होता.

'राजा येणार, राजा येणार—' म्हणून सारा गांव आनंदांत होता. गांव राजाच्या संस्थानापैकीं होता. संस्थानच्या चार पांच तालुक्यांपैकीं तो एक तालुक्याचा गांव होता. त्या दिवशीं त्या गांवढळ गांवांतील साऱ्या धूळभरल्या रस्त्यांना तुषार–स्नान घडले होते. भिजल्या मातीचा वास सर्वत्र दरवळत होता. पेठकऱ्यांचीं तेलकट दुकानें आज नीटनेटकीं झाली होती. बाजारपेठेच्या बोळकंडींत एकदोन ठिकाणीं तांबडीं आलवाणें फडकत होतीं. त्यावर वेगडी अक्षरें चमकत होतीं. 'श्रीमंत भवानराव पंडित प्रतिनिधि चिरायु होवोत !'

रस्त्यांशीं हातमिळवणी करणारी गृहस्थांचीं अंगणें रांगोळ्यांनीं सुशोभित केलेलीं होतीं. सरकारवाड्यासमोरच्या पटांगणांत प्रजाजनांनीं गर्दी केली होती. अधिकारी वर्ग माथ्यावरचे रुमाल चांचपीत व छातीवरची उपरणीं सांवरीत येरझाऱ्या करीत होता. न्हावून धुवून कपाळभर कुंकूं ल्यायलेल्या पूर्वाश्रमस्थ सुवासिनी राजाची वाट पहात दुतर्फा उभ्या होत्या. त्यांच्या हातीं पितळी थाळ्या होत्या. त्या









थाळ्यांतून निरांजनें पेटलीं होतीं. वाड्यासमोर येऊन मिळणाऱ्या प्रत्येक गल्लीच्या तोंडाशीं दर्शनोत्सुकांची गर्दी तुंबली होती. सर्वांच्याच डोळ्यांत औत्सुक्य वा आदर यावांचून दुसरा भाव नव्हता.

'त त त त्त त त्त थ्यु थ्युई थुई थुई ऽऽऽ'

कारंजें चढत जावें तसे गुरवाच्या शिंगाचे स्वर चढत गेले आणि जो तो पुढें सरसावला. सरकारी अधिकाऱ्यानें भुईपर्यंत वांकून मुजरे केले. राजाची मोटर आली. अस्पृश्य सुवासिनींनी डोईवरचे पदर आणखी पुढें ओढले. दुरूनच राजाला आरत्या ओवाळल्या.

वाड्याजवळच्या एका घराच्या बोडक्या माळवदावर मी उभा होतों. कुंबीवर छाती रुतवीत खालीं वांकून पाहत होतो. औंधाचा राजा खालीं उतरला. वाड्याकडे जायचा तो परत फिरला. त्या अस्पृश्य भगिनींच्या रांगेजवळ आला. त्यापैकीं प्रत्येकीच्या थाळींत त्यानें रुपया आठ आणे टाकले. गरीब संस्थानचा, गरीब राजा पण त्याची चालचलणूक एखाद्या हिंदु सम्राटासारखी. अस्पृश्य नायकापैकीं प्रत्येकजण चटाचट लवूं लागली. राजाला नमस्कार करूं लागली. राजाच्या तोंडांतून उद्‌गार निघत राहिले 'जय देव!' आपल्याला केलेली वंदना देखिल राजा स्वतःकडे घेत नव्हता, ती देवाच्या नांवें तशीच वाहून टाकीत होता.

प्रजाजनांतील पददलितांचा सत्कार प्रथम स्वीकारून मग राजा वाड्याकडे निघाला. राजा होता म्हताराच पण त्याची चाल ध्वजाच्या काठीसारखी ताट. चालतांना त्याची छातीच तेवढी प्रथम पुढें सरकते आहे असें वाटत होते. त्याचा वेष साधाच होता पण त्या साधेपणांतहि राजैश्वर्याची ऐट होती. डोक्याला लालभडक ब्राह्मणी पगडी, तिच्यावर डौलदार तुरा. अंगांत बारावंदीचा पायघोळ रेशमी अंगरखा, पायांत चुणीदार तुमान. बुटापुरताच त्याच्या वेशावर इंग्रजी पोषाखाचा संस्कार होता, एरव्ही सारा थाट अस्सल मऱ्हाटी. बघणाऱ्याला वाटावें कीं, राजपुरुष नुकताच पालखींतून उतरला असावा. माळवदावर जमलेल्या प्रजाजनांनीं एकदम राजाच्या नांवाचा जयजयकार केला. आणि त्यानें वर पाहिलें. मलाहि त्याच-वेळीं राजमुखाचें दर्शन घडले. रुंद कपाळ, भले मोठमोठे डोळे आणि प्रसन्न हंसणें. मी मनांतल्या मनांत खूप झालों. मी राजा पाहिला. त्याच्या कपाळावरचे तिरेघी गंध आणि त्या पांढुरक्या भरदार मिशा, माझ्या मनीं अगदीं ठसून गेल्या. जयजयकार ऐकत आणि मुजरे स्वीकारीत राजा सरकार वाड्याकडे जाऊं लागला. संस्थानच्या बँडवर मान–गीत वाजूं लागलें.

'जय अंबे हो, प्रतिनिधिस सुचिरसुखदा
सतत असो विजय,
जय अंबे हो, प्रतिनिधिस सुचिरसुखदा'

तें गीत ऐकत असतांनाच मला शाळेंत वाचलेला प्रतिनिधि घराण्याचा इतिहास आंठवूं लागला. किन्हईचे त्र्यंबकपंत कुळकर्णी... त्यांची औंधच्या यमाई देवीवरची निष्ठा...त्र्यंबकपंतांच्या पत्नीचे बाळंतपण प्रत्यक्ष जगन्मातेनें केले...त्यांना पुत्र झाला...परशुराम त्र्यंबक पंत प्रतिनिधी...ब्राह्मण घराण्यांत जन्मलेला महावीर क्षत्रिय... त्याचें शूरत्व...त्याचे कवित्व...

'श्री अंबिकेनें अभयंकराला
दिलें भिती कोण भयंकराला'

...सातारच्या छत्रपतींचें ते प्रतिनिधी कसल्याहि भयंकर संकटाला भ्याले नाहींत...महाराष्ट्रांत आणि प्रतिनिधींच्या घराण्यांत असंख्य उलथा पालथी झाल्या...एकदां तर खुद्द छत्रपतींनींच प्रतिनीधींच्या माथ्यावर दगड ठेवविला...खंडो बल्लाळांनीं त्यांना बांचविलें... प्रतिनिधीनीं चिटणीसांना वडलांच्या ठायीं मानले...श्राद्धाला ब्राह्मणाऐवजीं कायस्थ पंगतीला येऊं लागला...ती परंपरा दुसऱ्या परशुरामपंतांनीहि चालवली...दुसरा परशुरामपंत तर आवलीया... त्याचा उजवा हात युद्धांत तुटला...इतिहासानें त्याला संबोधले 'थोटा पंत'. त्या थोट्या पंताची जन्मदात्री आईच त्याच्या विरुद्ध उठली...पेशव्यांनीं त्याचा मुलुख जप्त केला...एक रख मात्र थोट्या पंताशीं एकनिष्ठ राहिली...थोट्या पंताच्या प्रेमासाठीं तिनें एक डोंगरी किल्ला लढविला...पेशव्यांच्या पंगतींत एक खारट आर्या खाकरत राहिली...

'तेल्णि मारिल सोटा
बापू गोखल्या, सांभाळ कासोटा'

थोटापंत निपुत्रिकच राहिला...त्याला दत्तक घेण्याची मुळींच इच्छा नव्हती...साहेबांनीं आणि संबंधितांनीं एक दत्तक मारून मुटकून त्याच्या मांडीवर बसविला...तो दत्तक राजपुत्र आपल्या वर्तणुकीनें राजर्षी पदाला पोंचला...औंध संस्थानचे विद्यार्थी देवाची करावी तशी आजतागायत त्याची प्रार्थना करीत होते...

'श्रीनिवास धीविकास चिद्‌विलास देईं
उपकृत मी सर्वपरी शरण तुझ्या पायीं'

त्या श्रीनिवासरावांचा औरसपुत्र म्हणजेच हा औंधाचा राजा.

त्या दिवशीं राजाला मी दुरून पाहिलें. जवळून पाहण्याची इच्छा होती ती कांहीं लौकर पुरी होईना. राजाच्या मुक्कामात गांवांत शिक्षकांचा मेळवा भरला. त्या मेळाव्याच्या अध्यक्षपदावरून राजानें साऱ्या शिक्षकांना सांगितले. 'विद्यादानासारखे दान नाहीं. मास्तरकी ही चाकरी नाहीं. ते एक थोर समाजकार्य आहे.' राजाच्या ह्या बोलण्यानें संस्थानच्या अर्धपोटी शिक्षकांच्या मुखांवरहि आनंद झळकला. शिक्षकांच्या मेळाव्या पाठोपाठ राजानें विद्यार्थ्यांनीं मांडलेल्या प्रदर्शनाला भेट दिली. त्या प्रदर्शनांतील वस्तू खरोखरच प्रदर्शनीय होत्या. शाडूच्या गोळ्याला पिवडी फासून एकाद्यानें तो गोळा पेरु म्हणून प्रदर्शनांत मांडला होता. देवाच्या मूर्ती चिखलांत रुतवून त्या छापांतून ओतून काढलेले मेण अनेकांनीं मूर्ति म्हणून मांडले होते. कोष्ट्याच्या पोरांनीं रंगीबेरंगी नाड्या विणून ठेवल्या होत्या. सुताराच्या लेंकरांनीं सामता पटाशीचे संस्कार करून सांदींतलें लाकूड उजेडांत ठेवले होते. कुणी कलमदानें बनवली होती. कुणी खुर्ची टेबल घडविण्याची खटपट केली होती. जिनगराच्या मुलांनीं कातरकाम आणि कागदी कुड्याची चित्रें केली होती. ज्यांना कांहींच करतां आले नव्हते त्यांनीं चित्रें काढली होती. त्या चित्रकलेंतला शिवाजी जिरेटोप घातलेल्या पोपटासारखा दिसत होता. दाढीच्या सादृश्यामुळें शिवाजी आणि अफझुलखान यांतला फरक ओळखणें कठीण झाले होते. त्या बालचित्रकलेंतील कुत्री आणि मांजरे सारखींच

अनुक्रमणिका

होती. ससा, कुत्रे आणि माणूस या तिघांची उंची सारखीच होती. ब्राह्मण विद्यार्थ्यांनीं आपली हस्ताक्षरेंच प्रदर्शनांत ठेवली होती.

राजानें तें सारे प्रदर्शन पाहिलें. मनःपूर्वक पाहिलें. कुशल विद्यार्थ्यांना बक्षिसें दिलीं. खुर्ची करणाऱ्या मुलाला त्यानें कारखानदार होशील असा आशीर्वाद दिला, तर मोडी अक्षर काढणाऱ्या मुलाचे उद्यांचा इतिहास संशोधक म्हणून कौतुक केलें. बक्षिस समारंभाच्या समारोपांत त्यांनीं आपला आशावाद ओरडून सांगितला. ' आज ओबड धोबड वस्तू करुन, प्रदर्शनांत मांडणाऱ्या ह्या विद्यार्थ्यांतूनच उद्यां ओगले, किर्लोस्करांसारखे कारखानदार निर्माण होतील. '

मुलांच्या प्रदर्शनाइतकीच आपुलकी राजानें व्यापारी मंडळींच्या पानसुपारीच्या प्रसंगीं दाखवली. व्यापाऱ्यांनीं आणलेले फुलांचे हार त्यानें नम्रपणें नाकारले. सुताचा हार समोर येतांच त्याची मुद्रा प्रसन्न झाली. व्यापाऱ्यांना उपदेश करतांना त्यानें एक सूत्र सांगितलें—' कच्चा माल विकूं नका. पक्का माल घेऊं नका. ' व्यापाऱ्यांना काय कळलें कुणास ठाऊक, पण राजानें सांगायचे होतें ते घसा खरवडून सांगितलें. राजाचा आवाज मोठा होता. त्याचे शब्द पोटांत उसळत आणि मग ओठांतून बाहेर पडत. त्यामुळें त्याचें बोलणें नेहमीच घसा खरवडून बोलल्यासारखें वाटे. त्याच्या भाषणांत हुकमत असे आणि आर्जवहि असे. वाणीसारखीच त्याची नजरहि दबदबा उत्पन्न करी आणि स्नेहाचाहि वर्षाव करी. सरकारी अधिकारी त्याचा उल्लेख ' पंतसाहेब ' म्हणून करीत. त्याचे अडाणी प्रजाजन त्याला म्हणत—' पंत बाबा'. पंत बाबाचा मुक्काम तालुक्यांत आला कीं खेड्यापाड्यांच्या उत्साहालाहि उधाण येई. राजाहि कुणाचा उत्साहभंग करत नसे. तो माळ्याच्या मळ्यांत डाळिंबे खाण्यासाठीं सहकुटुंब जाई व एकाद्या नगरशेठ्याच्या हवेलींत मेजवानीहि घेई. मात्र श्रीखंड चाखतां चाखतां आपल्या जरब भरल्या आवाजांत त्या शेठ्याला सांगे—' रुपयावर दोन आणे मिळवणें हा व्यापार, पण रुपयाचे दोन रुपये करणें हा अनाचार. '

प्रजाजनांतील ब्रह्मवृन्दांनीं एकादा धार्मिक समारंभ केला तर राजा मोठ्या आस्थेनें तिथें उपस्थित होई. ईदच्या सणादिवशीं आपल्या मुसलमान प्रजाजनांना तो पानसुपारी करण्यासहि विसरत नसे. महारवाडा ही तर त्याची आकस्मिक भेट देण्याची निश्चित जागा. त्याच्या तोंडांतून अस्पृश्य हा शब्द कधीं निघत नसे. अस्पृश्यांचा उल्लेख तो पूर्वास्पृश्य म्हणून करी किंवा त्यांना अस्पृष्ट संबोधी. त्याच्या राज्यांतील कुठल्याहि मंदिरांत अस्पृश्यांना मज्जाव नसे.

राजाचा तालुक्यांतील मुक्काम संपत आला आणि आम्हां विद्यार्थ्यांना सरकारी निमंत्रण आलें. शाळेंतले विद्यार्थी हे त्या राजाचे सर्वांत जवळचे आप्त. रांगारांगानीं आम्हीं सरकार वाड्यांत पोंचलों. त्या दिवशीं तर राजा राजासारखा मुळींच वाटला नाहीं. त्याचे वागणें अगदीं जवळच्या नात्यांतल्या एकाद्या वडील माणसासारखे होतें. आम्हां सर्व विद्यार्थ्यांना त्यानें पोटभर गाईचें दूध प्यायला दिलें. सर्वांची प्रेमळपणानें चौकशी केलीं. कुणाच्या पाठीवर त्यानें हलकीशी थाप दिली तर कुणाची हनुवटी कुरवाळली. एकाचे पोट थोडें थुलथुलीत होतें. राजानें चिमकोट्यांत धरलें आणि त्या पोराला त्यानें दरडावून विचारलें, ' नमस्कार किती घालतोस ? ' पोरानें नकारार्थी मान डोलावली आणि राजाला आवडीचा विषय सांपडला...' शरीरमाद्यं खलु धर्म साधनम् ' अशा अवघड देववाणींत मुक्त करुन त्यानें आम्हांला नमस्काराच्या व्यायामाचें महत्व पटवलें. आमच्या मास्तरांना ताकीत दिली, ' मुलांच्या बुद्धीपेक्षां त्यांच्या शरीरसंपत्तीकडे अधिक लक्ष द्या. '

त्या भेटींत माझें राजाशीं बोलणें झालें नाहीं, पण त्याचे बोलणें पुष्कळ वेळ ऐकत बसावें अशी पुन इच्छा माझ्या मनांत तीव्रतेनें उद्‌भवली. मी ती कुणाला सांगितली नाहीं, मनोमन बाळगीत राहिलों. राजाचा मुक्काम संपला. तो निघून गेला. त्याच्या थोरवीच्या गोष्टी मात्र पुढें महिना पंधरा दिवस दरवळत राहिल्या. उण्या पुऱ्या बहात्तर खेड्यांचें संस्थान. वार्षिक वसूल चार साडेचार लाख. पण राजाला आपल्या भूमीचा आगळा अभिमान. आपल्या अनाडी प्रजेबद्दल त्याच्या मनीं उमाप प्रेम. राजाच्या प्रथम दर्शनानंतर तीन-चार वर्षांनींच संस्थानच्या दुसऱ्या एका तालुक्यांत एक कथा घडली. मी त्यावेळीं त्या तालुक्याच्या गांवीं होतों. त्याहि गांवांत राजाचा मुक्काम आला. तें गांवहि लहानसेंच होतें. गांवाबाहेर एक छोटेखानी आंबराई होती. त्या आंबराईंत एक लहानसा बंगला होता. राजाचा मुक्काम त्या बंगल्यांत होता.

एका सकाळीं एक मराठमोळी म्हातारी बंगल्याच्या फाटकाशीं आली. राजा आपल्या नित्यकर्मांत मग्न होता. त्याचे सूर्यनमस्कार आटोपले होते, सर्वांगस्नान उरकलें होतें, पूजापाट उरकला होता. बंगल्याच्या अंगणांत एका पाटावर तो राजपुरुष एकाद्या पुतळ्यासारखा उभा होता. ताठ उभा होता. त्याचे हात जोडलेले होते. हनुवटी उचलली गेली होती. डोळे अगदीं स्थिर होते. त्यांच्या पापण्या पूर्ण उघडलेल्या होत्या. दृष्टि एकाग्र होती. समोर कोंवळें सूर्यबिंब तळपत होतें. आंब्याच्या मोहराचा वास दरवळत होता आणि राजा सूर्यदर्शनाचा व्यायाम घेत होता. एकाएकीं राजाची समाधी भंग झाली. फाटकावरचे पहारेकरी त्या म्हातारीला अडवीत होते. दरबारी रीतरिवाज माहित नसलेली म्हातारी पुनःपुन्हां कळवळून सांगत होती ' मला राजाला भेटायचंय, मला राजाला



" प्रिये—पण सचिवालय विकायला काढलेलं नाही ! "

भेटायचंय ' राजाच्या कानांना तिची आर्तता समजली. उभा होता त्या जागेवरूनच त्यानें दरडावून विचारले, ' कोण आहे ! '

एक पहारेकरी धांवत आला. राजापुढें आला. त्यानें चाचरत सांगितले...' एक बाई दर्शनासाठीं आलीय् '

' येऊं द्या तिला आंत ' राजा बोलला आणि दळ हलले. ती वेडीविद्री खेडूत बाई राजासमोर आली. एकदम त्याच्या पायावर पडली. राजा सोंवळ्यांत होता. त्याला तिच्या स्पर्शाचा विटाळ झाला नाहीं. बापानें लेकीला विचारावे तसें त्यानें तिला विचारले...

' काय झालं बाई ? काय पाहिजे तुला ? '

बाईनें रडत रडत सांगितले, ' सरकार तुमच्या एका अधिकाऱ्यानं लाच खाल्ली. तो आणखी मागतोय. माझ्यागांठीं दिडकी नाहीं. कुठून देऊं त्याला पैसा. पैसे दिल्याशिवाय तो माझे काम करत नाहीं. '

' नांव सांग त्याचे ' राजा गरजला.

बाईला कांपरे भरले. तिला बोलणें सुधारेना. मोठ्या मिनतवारीनें चाचरत चाचरतच तिनें त्या अधिकाऱ्याचें नांव सांगितले. राजानें तिचे सांत्वन केले व जातीनें तिच्या कामांत लक्ष घालण्यास आपल्या खाजगी चिटणीसाला फर्मांविले.

दुपारीं तो लांचखाऊ अधिकारी राजदर्शनाला आला. तो नमस्कारासाठीं राजाच्या पायाशीं वांकला. आशीर्वादाऐवजी राजाचा दंडा त्या अधिकाऱ्याच्या डोक्यावर बसला. अधिकाऱ्याच्या डोळ्या-समोर काजवे चमकले. ' मूर्खा, ' राजा ओरडला, ' माझ्या लेकरां-कडून लांच खातोस ! या घडीला माझे राज्य सोडून चालता हो. '

तो अधिकारी गेला. त्याला जाणे भाग पडले. पुढें महिनोगणती तो अधिकारी औंधाच्या राजाबद्दल पुण्याच्या वर्तमानपत्रांत कांहीं वाईट—साईट लिहित राहिला. त्याच्याएकीं राजानें कान घट्ट झांकून घेतले . कुणाचे कांहींच ऐकून घेतले नाहीं. ' राजा प्रकृति रंजनात् ' या सिद्धांतावर त्याचा विश्वास होता. राजाच्या मोठेपणाची ही गोष्ट ऐकल्यापासून तर माझ्या मनीं त्याच्याबद्दल भक्ति उत्पन्न झाली. त्याच्या प्रत्यक्ष सहवासाचा लाभ मिळावा अशी तहान मला लागून राहिली. राजापर्यंत पोचणें कुणाच प्रजाजनाला अशक्य नव्हते. पण त्याच्या प्रेमाला पात्र होणें सोपे नव्हते. राजा दयाळू होता पण भोळा नव्हता. खोट्याची त्याला मनस्वी चीड होती. लांचारींचे बोलणें त्याला ऐकवत नसे. सोन्यांतले हीन अचूक ओळखण्याइतका तो चाणाक्ष होता. राजानें जवळ करावे इतका कोणताच प्रभावी गूण माझ्या अंगीं नव्हता आणि तरीहि त्याच्या कृपेची इच्छा माझ्या मनीं वाढीला पडली होती. राजापर्यंत पोंचण्याचे एकच अस्त्र माझ्याजवळ होते, ते म्हणजे माझे पिढीजात दारिद्र्य. ते अस्त्र मी चालवलं आणि मी राजाच्या आसपास पोंचलों.

माध्यमिक शिक्षणासाठीं मी औंधास, प्रत्यक्ष राजाच्या राजधानींत आलों. राजधानीचा गांवहि राजाला शोभेसाच होता. लहानसा पण टुमदार. त्या एवढ्याशा गांवांत हायस्कूल होते. ' त्र्यंबक कला भुवन ' नांवाची एक औद्योगिक शिक्षण संस्था होती. अनंत मनोहर जोशी यांच्यासारखे तपस्वी गायक राजानें जवळ केले होते. त्यांच्या-कवीं तो गायन कलेचे विद्यादान करीत होता. राजा स्वतः तर चित्रकलेचा छांदिष्ट म्हणविण्याइतका प्रेमी होता. औंध संस्थानांतील शाळांतून चित्रकलेचे शिक्षण सक्तीचे होते. राजा कलाप्रेमी होता तसाच धर्मनिष्ठहि होता. कीर्तन या उपदेशकांच्या परंपरागत संस्थेवर त्याची प्रगाढ श्रद्धा होती. कीर्तनकाराच्या शिक्षणाची सोयहि राजधानीच्या गांवीं होती. महाराष्ट्रीय थोर थोर कीर्तनकार राजानें पदरीं बाळगले होते. त्याचा राजवाडा साधाच होता. लक्ष्मी-पेक्षां सरस्वतीचाच संचार त्या प्रासादांत अधिक्यानें होत होता. राज-वाड्याच्या दर्शनी अंगणांत सहा ऋतूंचे प्रतिकात्मक पुतळे उभे होते. तर पिछाडीच्या बाजूला मूर्तिकारांनी आपला कारखाना ठेवला होता. माडीवरील एका दालनांत अजंठ्यांतील चित्रकृतींच्या प्रतिकृति जशाच्या तशा चितारल्या होत्या. त्या दालनाचे नांवच होते अजंठा हॉल. राजवाड्यांतला चित्रसंग्रह खरोखरच अवर्णनीय होता. राजाच्या निद्रागारांत पूर्ण नलोपाख्यान तसविरींच्या रूपानें लटकत होते. तर एकादे दालन गजगौरीच्या चित्रकथेनें सुशोभित झाले होते. भारतांतील सर्व नामांकित चित्रकारांच्या कलाकृति त्या राजवाड्यांत होत्या. भिवा सुताराच्या रामपंचायतनापासून कोट्याळकरांच्या तांडवनृत्यापर्यंत वेगवेगळ्या कलाकृति दालनादालनांतून लटक-विलेल्या होत्या. राजा तसा विद्याविभूषित होता. डेक्कन कॉलेजांत त्याचें शिक्षण झाले होते. बी. ए. ची उपाधी त्यानें मिळवली होती. पुस्तक संग्रहाइतकाच त्याचा वाद्य संग्रहहि त्याच्या चोखंदळपणाची साक्ष देत होता. साऱ्याच कलांना त्याच्या लेखीं आदराचे स्थान होते. राजाचे कलाप्रेम हे त्याच्या ऐषआरामाचे द्योतक नव्हते. कलावंताच्या जबाबदारीची त्याला जाण होती. मोठमोठे शास्त्रीय गायक कऱ्हाड देवीपुढें कीर्तनाला उभे राहात होते. कलेचे हात संस्कृतिवर्धनासाठीं राबत होते. राजाची देवावर निष्ठा होती, धर्मावर श्रद्धा होती, गीर्वाण भाषेंतील साहित्यावर तो जणूं लुब्ध होता. त्याच्या ह्या सर्व आवडी निवडी त्याच्या निवासस्थानांत साकार दिसत होत्या.

मी औन्ध हायस्कुलांत दाखल झालों. मला विद्या मोफत मिळत होती, रोजचे अन्नहि विनामूल्य मिळत होते. मला राजाश्रय मिळाला होता पण राजकृपा मात्र माझ्या वाट्याला आली नव्हती. औन्ध हायस्कुलांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना राजाच्या डोळ्यांत भरणें फारसे अवघड नव्हते कारण राजाची दृष्टी सर्वांत अधिक शिक्षण-संस्थावर होती. शाळेंत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांएकीं त्याच्या मनीं उपजतच माया होती. भूत आणि वर्तमानापेक्षां भविष्याबद्दल तो अधिक जागरुक होता. विद्यार्थ्यांच्यासाठीं त्यानें अनेक सोयी केल्या होत्या. प्राथमिक शिक्षणाला कुठेंच शुल्क नव्हते. माध्यमिक शिक्षणाची फी होती केवळ दोन आणे. औंधांत तर विद्यार्थ्यांच्यासाठीं फ्री बोर्डिंग होते. अत्यंत अल्प भाड्याची वस्तीगृहें होती. त्या वस्तीगृहांतील खोलीचे भाडे देखिल केवळ सहा आणे. मी पंचवटी नांवाच्या वस्तीगृहांत राहात होतों. फ्री बोर्डिंगांतील अन्नावर निर्वाह चालला होता. जगदंबेच्या नैवेद्या इतकेच राजाचे लक्ष विद्यार्थ्यांसाठीं शिजवल्या गेलेल्या अन्नाकडे असे. विद्यार्थ्यांसाठीं त्यानें सर्व सुखसोई तर केल्या होत्याच पण त्यांच्यावर कसलाहि कुसंस्कार घडूं नये याचीहि काळजी त्यानें कटाक्षानें घेतली होती. औंध

( पान ३० वर पुढें चालू )

अश्लील वाङ्मयाचें वाचन करणें हें पाप ! केलेंच तर तें जाहीरपणें कबूल करणें हें महापाप !! आणि अश्लील वाङ्मयाच्या रसग्रहणाची चर्चा करणें म्हणजे तर अति महापापच होय !!!



# अश्लील (?) वाङ्मयाचें रसग्रहण

—प्रा. ल. ग. जोग

वाङ्मयाचें यश मोजण्याचे अनेक मार्ग असूं शकतील. परंतु कलाकृतीचें रसग्रहण करावें असें वाचकाला वाटावें—उत्कटतेनें वाटावें यांत वाङ्मयाचें यश निश्चित ओळखतां येतें. वाङ्मयाचें विभाग पाडणारांनीं सरस व निरस असे दोन ढोबळ विभाग पाडले आहेत. नीरसत्व पारखणें हेंहि एक प्रकारचें रसग्रहणच म्हणावें लागेल. वाङ्मयाचे श्लील व अश्लील असे दोन भाग कल्पिले तर बहुतांशीं रसग्रहण श्लीलाचेंच केलें जातें. अश्लील वाङ्मयाचें वाचन करणें हें पाप ! केलेंच तर तें जाहीरपणें कबूल करणें हें महापाप !! आणि अश्लील वाङ्मयाच्या रसग्रहणाची चर्चा करणें म्हणजे तर अति महापापच होय !!!

आजच्या मराठी ललितवाङ्मयांत अश्लीलता फारच आढळते असा एक लोकप्रिय आक्षेप आहे. आक्षेपकांच्या प्रामाणिकपणाबद्दल संशय घेण्यासारखें कांहीं नाहीं. आक्षेपकांपैकीं एका वर्गाचा या बाबतींत थोडा गैरसमज आढळतो. त्यांच्यामतें ललित वाङ्मय आज फारच अश्लील होतें आहे; व पूर्वी तें तसें नव्हतें. हें खरें नाहीं. मराठीपुरतें बोलायचें तर ज्ञानेश्वरांपासून मोरोपंतांपर्यंत सर्वांनीं अश्लील लेखन केलें आहे. आजच्या अश्लीलत्वाच्या दृष्टिकोनांतून संस्कृत महाभारत चाळलें तर आजचें अश्लील फारच कमी म्हणायची वेळ येईल. थोडक्यांत म्हणजे संत व पंत कवी ह्या दोषापासून सर्वस्वीं मुक्त नाहींत. अश्लील वाङ्मय नेहमींच निर्माण होत आलें आहे. आणि म्हणून तें आजच्या वाङ्मयांत प्रकर्षानें आढळतें हें मत अनभ्यस्त टीकेचें लक्षण होय. लावणीकार मुळांतच जरा फाजील म्हणून दूर केले व इतर जुन्या वाङ्मयाकडे पाहिलें तर विधान उलटच करावें लागेल असें वाटतें—आजचें वाङ्मय जुन्या वाङ्मयाहून अश्लीलतेंतहि हिणकसच ठरतें–असें म्हणावें लागेल.

अश्लीलत्व सिद्ध करणें मोठें कठीण काम आहे. आपण जेव्हां जुन्या काळांतल्या वाङ्मयाकडे पहातों तेव्हां आपली मनोभूमिका अर्वाचीन असते. म्हणजे ज्या संकेतांना वा शब्दसमूहाला आपण आज अश्लील म्हणतों ते संकेत वा शब्द त्या काळीं कदाचित् अश्लील गणले जातहि नसतील. उदाहरणार्थ आपलें 'कामालय' एका हातानें लपवून पळत जाणाऱ्या नग्न स्त्रीचें चित्र जेव्हां व्यास रेखाटतो तेव्हां त्याला 'हें आपण कांहीं अश्लील लिहितों आहोंत' असें वाटत नसावें ! महाभारतांत वीर्यपतन व वीरपतन यांच्या देखाव्यांची संख्या मोजली तर अखेर वीरांचे त्या स्पर्धेंतहि पतन होईल कीं काय अशी शंका येते ! हें सारें त्या लेखकांनीं सहज व सफाईदार रीतीनें लिहिलें आहे. याचा अर्थ असा कीं हीं वर्णनें तेव्हां एकतर अश्लील वाङ्मयांत जमा होत नसावींत अथवा त्यावेळींहि व्यासांसारखा वाक्प्रभु असें अश्लील लिहित होता असें मान्य करावें लागेल. पृथ्वीच्या पाठीवर असाहि एक देश आहे कीं जेथें मनगट अनावृत करणें म्हणजे निर्लज्जतेची परमावधी झाली ! आमच्या संकेतानुसार ह्या देशांत सारी जनताच नग्न. कारण कपडे असणार मनगटाभोंवती !! स्थलकाल सापेक्षहि या कल्पना बदलत जात असाव्यात असें दिसतें.

जुन्या वाङ्मयभक्तांना 'भले तरी देऊं ××× लंगोटी'' करणी करितां + + फाटे' असल्या तुकारामोक्ति वानगी म्हणून (काय पण वानगी ?) पुढें केल्या, अथवा वामनपंडिताच्या 'कात्यायनी व्रतांतले' उतारे सांगितलें म्हणजे एक वादग्रस्त मुद्दा पुढें येतो. नदींतून वर येऊन विवस्त्र स्त्रियांनीं हात जोडून कृष्णाला नमस्कार केल्याचें शब्दचित्र जेव्हां

वामन रेखाटतो तेव्हां 'हें सारें अध्यात्मिक रूपक आहे' असें उत्तर जुन्यांच्या अभिमान्यांकडून येतें. उगाच नाहीं जुन्या काळांत लोकांना अध्यात्माची अवीट गोडी लागली ती! पण त्यांतल्या त्यांत कमी अश्लील लिहिणारा मोरोपंत जेव्हां 'निर्लज्जा अपवित्रा मदिरारस सेविती स्त्रिया अ-सती। असती तशा न कोठें, हगती मुतती उभ्या, न त्या वसती' असें कर्णमुखानें म्हणतो तेव्हां त्याला आध्यात्मिकतेचेंहि कवच लावतां येत नाहीं. ज्या तत्त्वांवर जुन्या वाङ्मयांतील अश्लीलत्वाचें समर्थन करतां येईल त्या तत्त्वांवर नव्या वाङ्मयांतील अश्लीलतेचें समर्थन सहज शक्य होईल.

परंतु असें समर्थन वा आक्षेप दोनहि योग्य नव्हेत. कारण अश्लील वाङ्मयाचें रसग्रहण कांहीं वेगळ्या भूमिकेवरून करतां येईल असें वाटतें. किंबहुना तशी भूमिका हीच अधिक योग्य भूमिका म्हणावी लागेल.

ह्या भूमिकेचें सूत्र असें :—

अश्लील वाङ्मयांतल्या अश्लीलत्वांतहि श्रेष्ठ कनिष्ठ असतें. व अश्लील वाङ्मयाचें रसग्रहण उच्च नीचत्वाच्या तुलनात्मकतेनें करतां येईल.

तुकाराम, वामन, मोरोपंत यांच्याप्रमाणें मुक्तेश्वर हाहि एक अश्लील लिहिणारा कवि आहे. किंबहुना या प्रांतांतला तो सम्राटच म्हणावा लागेल. ह्या कवीनें रचलेल्या महाभारत पर्वांतील अश्लील वर्णन पाहिलें तर अश्लील वाङ्मयांतल्या उच्च नीचत्वाची कल्पना चटकन् येईल. त्यानें आदिपर्वांत लिहिलें आहे :—

(१) कुचपयःपात्र देखतां नयनें।
पुरुष-मार्जार मियों म्हणे
हृदयीं हाणितल्या चरणें।
वळें संघटे पदसंधी ॥
वर्मीं ताडितां कठिण वचनीं।
लिंग मुख दाटी भगभाजनीं
वोंठ चाटीत रोमस्थानीं।
पुच्छ उभारी पुढारें ॥
कीं विषयविष्ठेलागी टोंकती।
मूत्रमोरियें नित्य रमती
नग्न स्त्रियांभोवतें भोंवती।
ते शूकर व्यक्ति नरदेहीं ॥
५१-५२-५३
९

(२) अधरपान आंचवणें।
गाढालिंगन मेळवणें ॥
आसक्तिवाहला गोवूनि मनें।
वश्य कीजे द्विजधेनू ॥
तळीं भगपात्र वोढवून।
नेमें त्राहाटीं लिंगस्तन ॥
वीर्य दोहनें करुनि क्षीण।
तपश्चर्या नागवीं ॥ ११९-१२०
१५

(३) मद्रेतस्त्वात्योदकाची वृष्टी।
धरी गुह्यांग शुक्तिसंपुटीं ॥
रत्न निपजेल जें का सृष्टीं।
मोलागळें त्रैलोकीं ॥ २३
१६

(४) नपुंसकलिंग पोडशांगूळ।......
५९ सभापर्व
५

हीं सर्व वर्णनें अश्लील आहेत यांत शंका नाहीं. यांतील कांहीं वर्णनें तर चर्चेच्या पलीकडचीं आहेत. पण या अश्लीलपणांत एक प्रकारचीं अलंकारचमत्कृती आहे. व म्हणून अशा अश्लीलवर्णनाचें रसग्रहण करतांना या चमत्कृतीकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे. उदाहरणार्थ 'विश्वामित्र ही धेनू तूं वश करावीस' या मूळ कल्पनेचा विस्तार कवीनें किती सूक्ष्म व पूर्णपणें केला आहे तें पाहाणें हा या ओव्यांकडे पाहाण्याचा रास्त दृष्टिकोन होय. गुरुचरित्रासारख्या धार्मिक ग्रंथांत येणाऱ्या अश्लीलांत हें वाङ्मयीन वैशिष्ट्य नाहीं असें दिसेल. निरंजन माधवासारखा सोज्वल कवी जेव्हां 'पंढाचें अति लंब मेहन जसें लोंबे दहा अंगुळें' म्हणतो तेव्हां त्यांत काव्य नाहीं ओंगळपणा आहे. म्हणून तें अश्लील नीच वा हीन अश्लील म्हणतां येईल. मांजराच्या सर्व क्रियांचा पुरुष स्त्रीचा उपभोग घेत असतांनाच्या क्रियांशीं संबंध जुळवणें हें चातुर्याचें आहे यांत शंका नाहीं. सभापर्वांत पांच पांडव व एक द्रौपदी यांच्याबद्दल 'पंच कुंजर भिडतां देखा, ठाव नुरे कर्दळीचा' ९।७८ असें जेव्हां तो म्हणतो तेव्हां त्याच्या सूचकतेचें व उपमानाचें रसग्रहण हें खरें अश्लीलतेचें रसग्रहण म्हणतां येईल.

अश्लीलत्वाच्या वर्णनांत केव्हांकेव्हां मानवी जीवनाचें नेमकें व मार्मिक दर्शन घडतें. नागेश कवीचें सीतास्वयंवर हें एक असें विचित्र काव्य आहे. वस्तुतः त्यांत काव्य कमीच आहे. हीन दर्जाचें अश्लीलहि आहे. परंतु दोन ठिकाणचीं त्यांची वर्णनें व तरल कल्पनाशक्तीनें निर्माण केलेला एक प्रसंग लक्षांत राहाण्याजोगा आहे. रामापुढें दगड आणून टाकून कित्येक असंतुष्ट नवरे त्याला दगडाला पाय लावायला सांगतात. त्यांच्यामतें रामपदस्पर्शानें प्रत्येक दगडांतून कुणी सौंदर्यवती निर्माण होईल. व 'ज्याचा दगड त्याची स्त्री' ह्या न्यायानें आपण तिला घेऊन जाऊं असा त्या नवरोजींचा बेत असतो. तेथें पहिल्या बायकोचा वीट कां आला याचीं प्रत्येकानें कारणें दिलीं आहेत. ती घोरते—एक कारण; ती (स्वतः-चेच!) दांत खाते—दुसरें कारण—हें सारें अत्यंत जीवनदर्शी आहे यांत शंका नाहीं. मुक्तेश्वराच्या अश्लीलतेंत पुष्कळदां हें जीवन-दर्शन इतकें वेधक असतें कीं सभ्यतेनें केलेल्या रटाळ लेखनापेक्षां हें लेखन आवडूं लागतें.

(१) वनिता मनोरम एकांतीं।
आपण होवोनि पुरुष प्रार्थी।
तेथें जो निर्विकल्प चित्तीं।
तो शंकर म्हणों ये ॥ आदि २।७८.

(२) तैसींच पुरुषांचींहि मनें।
सुंदर परस्त्री अवलोकनें ॥
देखतक्षणीं ततक्षणें।
मनें भोगूनि जाइजे १५।४४

(३) मैथुनकाळीं विवेकी नर।
होय पिशाचमति वानर १९।२७.

(४) मैथुनांती रेतपात।
जीवमात्रा आल्हाद करीत २४।२१.

हीं उदाहरणें अश्लील असलीं तरी अभ्यसनीय आहेत. हीं सर्व उदाहरणें श्रेष्ठ दर्जाचें अश्लील वाङ्मय होय. कारण यांत मानवी जीवनाचें दर्शन घडतें. पहिल्या उदाहरणांतील पुरुषाला 'शंकर' म्हणावें. हा तर थोडा विनोदाचाहि भाग म्हणतां येईल. पुरुष मनाचें काढलेलें दुसरें चित्र तर मानसशास्त्रीय भूमिकेशीं ताडून पाहाण्यासारखें आहे. संभोग क्रियेचें पुरुषाच्या भूमिकेंतून रेखाटलेलें 'पश्चात्बुद्धि'चें चित्र जसें मार्मिक आहे. तसें वीर्यपतनानंतर जीवमात्राला होणाऱ्या आनंदाचें वर्णनहि मार्मिक आहे. हें सारें अश्लील, अश्लील असलें तरी श्रेष्ठ आहे, उच्च दर्जाचें आहे. (पान २६ वर पुढें चालू)




## बायका आणि बजेट

—बाळ सामंत

परवां बायकोचं न् माझं मोठ कडाक्याचं भांडण झालं ! भांडणाचा विषय अगदींच क्षुल्लक होता. त्यादिवशीं मी कधीं नव्हतो तों भाजीमार्केटांत गेलों. आणि वऱ्याच दिवसाचा सूड म्हणून चांगली सहा रत्तल भाजी, पेरू, शेंगा, एक भलं मोठं कलिंगड, शेवग्याच्या शेंगांच्या पांच जुड्या, दोन रत्तल कच्च्या कैऱ्या हें सर्व सामान 'पाटीवाली'च्या डोकीवर देऊन मी घरीं आलों तर घरीं रौद्रावतार.

"साधी रत्तलभर भाजी आणायला सांगितली तर गांव खरेदी करून आले—अशानें संसार कसा होणार—काडीइतकं व्यवहार-ज्ञान नाहीं."

बायकोचं हें साभिनय व्याख्यान ऐकून घेतल्याखेरीज आजकाल कोणत्याच पुरुषाला गत्यंतर नसतें. कारण बायकांची जात ही भारी काटकसरी असा खोटा प्रवाद कुणीतरी पसरवलाय ना !

मला वाटतं बायकांना काटकसरी म्हणणं म्हणजे काटकसर या शब्दाची अक्षरशः विटंबना आहे. पुरुषांच्या संसारचे तीनतेरा वाजविण्याऱ्या या स्त्रीजातीला काटकसरी म्हणून कांहीं चोंबड्या पुरुषांनीं उधळेपणाची जणूं सनदच बहाल केली आहे. आजकाल नवऱ्यापेक्षां नवऱ्याच्या पगारावर बायकांचा जास्त डोळा असतो. या पगाराच्या दिवशीं बायका मोठ्या प्रेमांत येतात—लाडांत येतात, नखरा करतात. आपल्या सर्व गुन्ह्यांना माफी देतात—उत्तम गाळलेला चहा, बटाटेपोह्यांसह येतो, त्यादिवशीं आमटी उत्कृष्ट होते, भाजींत मीठ बेताचंच असतं, भाताचा गिचगोळा झालेला नसतो आणि कांचेच्या ग्लासांतून जेवणानंतर थंडगार ताक आणि वर सौभाग्यवतीनें आपल्या हातानें तयार केलेला विडा.

संसारांतल्या रम्य उषःकालाची आठवण देणारा हा दिवस अलीकडे महिन्यांतून एकदांच पाहिल्या तारखेलाच अवतीर्ण होतो. त्यानंतर मात्र सारे दिवस 'भयाण अंधाराचे–रौद्र वादळाचे !'

जगांतल्या प्रत्येक बायकोची प्रामाणिक समजूत अशी कीं आपण महान् काटकसरी आहोंत. आपलं वागणं कसं हात राखून असतं. येऊन जाऊन सारा बुडवेपणा यांच्याकडेच. हे जरा आटोक्यांत असते—त्यांचं पानतंबाखूचं, सिगारेटीचं, आणि रमी खेळण्याचं वाईट व्यसन त्यांना नसतं तर आपला संसार सोन्याहून पिवळा झाला-असता असं प्रत्येक बायकोला प्रामाणिकपणें वाटत असतं.

दर महिन्याला आपण अंदाजपत्रकाप्रमाणें खर्च करावयाचा असं आमची बायको ठरवते. अगदीं भारतसरकारच्या बजेट प्रमाणें एका वहीवर सर्व खर्चांनीं कोष्टकें तयार; पण आतांपर्यंत या कोष्टकापर्यंत एकादांहि आमची मंडळी वागलेली नाहीं. करमणुकीवर आपण फारच खर्च करतों (आपण म्हणजे मी) असं म्हणून ती दर महिन्यास पांच रुपये मंजूर करते. पण तिच्या उच्च तत्त्वामुळें या पांचाचे पंचवीस होऊन माझी पांचावर धारण बसते. ती उच्च तत्त्वें, नेहमी उत्तम थेएटरांत सिनेमा पाहायचा. माझ्या दुर्दैवानें सगळीं उत्तम थिएटरें आमच्या घरापासून फार दूर असल्यामुळें सत्यानाश (टॅक्सीपायीं). त्यानंतर 'मेलं जवळ बसल्यानें डोळे दुखतात बाई.' या सबबीखालीं (व बायकोच्या प्रकृतीला जपलंच पाहिजे) बाल्कनीचा भुर्दंड. (याच्या जोडीला भाजलेल्या शेंगा, चणे यांचा तोबरा अधूनमधून हवाच.) शिवाय अलिकडे प्रत्येक सिनेमाला उदंड गर्दी होत असल्यामुळें केव्हां केव्हां बाल्कनीचंहि तिकीट मिळणं कठीण होतं. अशा वेळीं 'मागें म्हणून परतायचं नाहीं' असें आणखी एक उच्च तत्त्व तिचं आहे. परमेश्वर कृपेनें सगळींच तिकीटं संपली तर या नाहीं दुसऱ्या थेएटरांत जाऊं म्हणून आमची सहकुटुंब वरात निघायचीच.

आतां खर्चाचा दुसरा 'आयटेम' म्हणजे कपडे. कपडा विषयांत आपल्या नवऱ्याला कांहींच कळत नाहीं आणि पातळें व ब्लाऊज पिसीस या बाबतींत तो अगदींच बथ्थड आहे हें सर्वच बायकांचें लाडकें मत असतें. आतां २५ रुपयांच्या ऐवजीं २० रुपयाचं पातळ घेऊंया अशी मी काटकसरीची सूचना केली—तर "अलीकडे मला मेलीला असलं कांहीं घ्यायला सवड कुठं होतेय !" असं म्हणून आणि शेवटीं 'तुम्हाला हौसच नाहीं' असा शेरा देऊन २५ रु. ची खरेदी होतेच. अलीकडे दुकानदारहि लेकाचे भलतेच चावट झालेत. त्यांतला एकादा चावट माणूस ताईसाहेब याला मॅचिंग कलरचा हा टाफेटाचा पीस घ्याच म्हणून मागें लागतो. या ताईच्या शेजारीं उभ्या असलेल्या निर्बुद्धाला कसलाच कलर उपयोगाचा नाहीं म्हणून तो मला एकहि बुशशर्टचं कापड सुचवत नाहीं. आपल्या आईच्या या खरेदींत आमच्या कल्पनेच्या डोक्यांतहि फ्रॉकच्या कापडाच्या खरेदीची कल्पना वळवळूं लागते आणि ती मला चिमटे आणि आईला विनवणी करूं लागते. शेवटीं त्या आगाऊ दुकानदाराच्या



'विकली' बजेट



अनुक्रमणिका

मदतीनें ५५ रु. ७० नये पैसे असें बील करून शेवटीं नाहींतरी बरंच स्वस्तांत पडलं नाहीं—त्यांना आणायला सांगितलं असतं तर शंभराचा खुर्दा उडाला असता असं पुटपुटत ती लब्बाड आणि धूर्त स्त्री दुकानाच्या पायऱ्या उतरते. ( अर्थात् तें अगडबंब पुडकें माझ्या हातीं. )

या कपड्यापायीं आमचं अंदाजपत्रक कायमचें तुटीच्या अर्थसंकल्पावर आधारावें लागतें. या अर्थसंकल्पांत अधून मधून श्वसूरगृहांतून कांहीं परकी चलन येतें पण त्याचा निर्देशहि कधीं होत नाहीं.

या नैमित्तिक भानगडींत केव्हां केव्हां फार तापदायक 'आयटेम' अचानक आ करून उभे राहातात. त्यांतला एक तापदायक भाग म्हणजे सौभाग्यवतीचें मंगळसूत्र. या मंगळसूत्राच्या अलिकडे रोज नव्या नव्या फॅशन्स निघतात आणि हा अलंकार आमच्या बायकांचा जीव कीं प्राण असल्यामुळें त्याच्या दर महिन्याला फॅशन्स बदलतात. आजकाल सुवर्णकार मंडळीबद्दल तर माझे फार वाईट मत झालें आहे. या धंद्यांत कांहीं ब्राह्मण मंडळी पडल्यामुळें आमच्या संसारांत विनाकारण कूट प्रश्न निर्माण झाले आहेत. "त्यामुळें माझ्या बांगड्या जरा झिजबट वाटतात नाहीं—किंवा आतां परवां सुलभावहिनींनी ( ही माझ्या भावाची बायको नव्हे ! ) छान नव्या तासाच्या अन् घसघशीत केल्या आहेत." अशी पुस्ती जोडून परत आमच्या अंदाजपत्रकाचे दिवाळें वाजायला लागतें.

मासिक खरेदींतील आणखी महत्त्वाचा भाग म्हणजे पावडर, तेलें, स्नो आणि मंडळी. आपण फार सुंदर आहोंत ( आपल्या नवऱ्यापेक्षां खात्रीनेंच ) अशी प्रत्येक बायकोची भोळी भाबडी समजूत असते. हें सौंदर्य टिकविण्यासाठीं आणि वाढविण्यासाठीं हा सौंदर्यप्रसाधनाचा पसारा हवाच. पण यांतहि सूक्ष्म भेदाभेद आहेतच. पोरांना घरभर करायला म्हणून हिमालय बोके तर आपल्याला पॉंडसची एंजल फेस. तेलाची बाटली ही विकत घेतल्यानंतर आठ दिवसाच्या आंत फुटलीच पाहिजे. पण तें तेल माझ्या एकुलत्या एक वूलन पँटवर सांडल्याशिवाय गंमत नाहीं. माझा मुलगा तैलबुद्धीचा व्हावा म्हणून त्याला डोकीवर थापण्यासाठीं अस्सल खोबरेल शिवाय निराळेंच. याशिवाय आमच्याकडे महिन्याला किती डझन डोकीच्या पिना, किती ग्रोस सेफ्टी पिना आणि कितीसे डोकींतले आंकडे लागतात. यांचा हिशोब करायला एक स्वतंत्र माणूसच ठेवावा लागेल. रुमाल नामक किरकोळ वस्तु ही हरवण्यासाठींच आहे. ( तरी बरं ते ठेवण्यासाठीं चांगली 'बंदिस्त' जागा आहे ! )

खर्चाच्या या झपाट्यामुळें आमच्या संसाराच्या बजेटचें नेहमींच तीन तेरा वाजतात. साधारण महिन्याची अखेरी आली कीं आमचा अर्थमंत्री धुसफुस करीत राजीनाम्याच्या गोष्टी करायला लागतो. नवऱ्याच्या खिशावर डोळा ठेवून हा अर्ज मी स्वीकारावा असा तगादा लावला जातो. पण अर्थमंत्रिपदाबाबतची ही विरक्ति तीन दिवसापुरतीच मर्यादित असते. पुन्हां एक तारीख आली कीं सकाळींच राजीनामा मागें घेतला जातो आणि परत बजेटाची चर्चा—

आतां तुम्हींच सांगा—अशा परिस्थितींत बायकांना काटकसरी अर्थमंत्रि कोण म्हणेल ? पण करणार काय ? म्हणतात ना आपलेच ओठ नी आपलेच दांत—तशांतली गत !

●●

( पान २४ वरून )

सारांश अश्लीलत्व ज्या शब्दसमूहानें वा संकेतानें होतें ते शब्द संकेत सर्वकाळीं सारखेच राहत नाहींत. आणि अश्लील वाङ्मयांतहि कांहीं वरच्या दर्जाचें अश्लील वाङ्मय आढळतें. मनोहर कल्पना-विलास, सूक्ष्म जीवनदर्शन, इत्यादि थोर साहित्याचे गुण त्यांत असू शकतात. अश्लील वाङ्मयाचें रसग्रहण करतांना ही दृष्टि टीकाकाराला आवश्यक ठरेल.



**का. सं. प. या. ले. १८३ ]** [ १९ एप्रिल १७६०

**( १७१ ) पो. छ. २२ रमजान**

## लाडके व्हाल तें कामाचें नाहीं

[ त्रिंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे व सदाशिवराव भाऊ पानिपतचे स्वारींत जात असतां रस्त्यांतून हें पत्र महिपत त्रिंबक ऊर्फ बजाबा पुरंदरे यास लिहिलेलें आहे. बजाबा त्या वेळीं लहान दहा बारा वर्षांचा असावा. त्याच्या शिक्षणाची विशेष काळजी पत्रांत दाखविलेली आहे. ]

॥ श्री ॥

चिरंजीव राजमान्य राजश्री बजाबा यांसी प्रति सदाशिवें चिमणाजी आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जागें विशेष.—तुम्हांकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी वरचेवर सविस्त वर्तमान लिहित जाणें. आम्ही मजल दर मजल नर्मदापार झालों. पुढेंही दरकूच जात असों. घोड्यावर बसणें व लिहिणें पढणें चांगलें करणें. तीर्थरूप बोलावतील तेव्हां पुण्यास जात जाणें. फार न खेळत जाणें. घरीं अबई* मायेनें रागें भरणार नाहीं, लाडके व्हाल तें कामाचें नाहीं. चांगलें लिहिणें, पढणें, घोड्यावर बसणें करणें छ. २ रमजान. हे आशिर्वाद.

* अंबाजी पुरंदरे यांची पत्नी. तत्कालीन समाजांत तिची मान्यता मोठी होती.

अनुक्रमणिका

संसार हा एक सारिपाट आहे. संयमाने आणि एकदिलानें तो खेळला तर तो उधळून जायची भीति नाहीं. नपेक्षां चाळींतल्या मुलांनीं दुपारच्या उन्हांत पोरखेळ मांडावा, आणि...




—अच्युत बर्वे

दारावर दार आपटल्याचा एकदम मोठा आवाज झाला आणि श्रीपादरावांची झोंप चाळवली गेली....

चाळींतल्या बि-हाडात दुपारच्या वेळीं एखाद्याला शांतपणें झोंप मिळणें मोठें कठीण होते. नळावर भांडी घासणाऱ्या गड्यांचा गोंगाट, खेळणाऱ्या मुलांचा हैदोस आणि फेरीवाल्यांच्या आरोळ्यांनीं चाळींतली दुपारहि गजबजलेली असे. ह्या गडबड गोंधळाचा संमिश्र कोलाहल बि-हाडाबि-हाडांत घुसे आणि खोल्याखोल्यांतून घुमत राही. पाट्यावर टाकी लावावी तसा हा आवाज माणसांच्या डोक्यावर घण मारी. वाकुल्या दाखवून एखाद्याला जेरीस आणावे तसा हा आवाज माणसांना अस्वस्थ करी. निवडटिपण करूं देत नसे, कांहीं लिहूं वाचूं देत नसे, कीं साधी डुलकीहीं घेऊं देत नसे. डोकं सैरभैर करणाऱ्या ह्या आवाजाला बाहेरच्या बाहेर थोपवून धरावं म्हणून श्रीपादरावांनी जेवणखाण झाल्याबरोबर दारंखिडक्या बंद करतांना त्यावरची शटर्सहि ओढून घेतली होती. खोलींतला पंखा सुरूं केला होता आणि बिछान्यावर अंग टाकलं होतं. खोलीबाहेरच्या वातावरणाची सशब्द चाहूल चुकारपणें थोडा वेळ खोलींत रेंगाळली होती. गरगरणारा पंखा जडावलेल्या डोळ्यांना थोडा वेळ दिसत राहिला होता आणि मग हलके हलके कांहींच दिसत नाहींसें झाले, कांहींच ऐकूं येईनासे झाले. पाहतां पाहतां मिटल्या पांपण्याआड स्वप्नांचा धिंगाणा चालूं झाला...

...श्रीपादराव कितीतरी वेळ नुसतेच चालत राहिले. पायाखालचा रस्ता संपत नव्हता आणि हवें असलेलें घर सांपडत नव्हतें. चालून चालून पाय दुखूं लागले होते आणि श्रमामुळें घशाला कोरड पडली होती. पण डोळे मात्र न दमतां न कुरकुरतां हव्या असलेल्या घराचा मागोवा घेत राहिले. आणि अगदीं अचानकपणें हवें असलेलें घर दृष्टीस पडलें. धांवत पळत श्रीपादराव तिसऱ्या मजल्यावर गेले आणि त्यांनीं दारावरची बेल वाजवली. दार उघडले गेले आणि दरवाजांत मालती दिसली तेव्हां तिला हांक मारण्याकरतां श्रीपादरावांचे ओंठ विलग झाले. ते पुढे झाले तोंच तिनें दरवाजावर हात ठेवला आणि त्यांच्याकडे तिरस्कारानें पहात विचारलें, "कशाला आलांत पुन्हां इथं !"











" तुला न्यायला. घरीं घेऊन जायला मालू. " पण त्यांचे बोलणें पुरे व्हायच्या आंतच तिनें पट्‌दिशीं दरवाजा लावून घेतला. फळीवर फळी आपटली तेव्हां मोठा आवाज झाला आणि श्रीपादराव दचकून जागे झाले.

श्रीपादरावांनी डोळे किलकिले करून आजूबाजूला पाहिलं तेव्हां त्यांच्या लक्षांत आलं कीं आपल्याला केवळ स्वप्न पडत होतं. आपल्याला मालती दिसली ती स्वप्नांत. आपल्या तोंडावर तिनें दरवाजा लावून घेतला तोही स्वप्नांत. पण स्वप्न म्हणावं तर फळीवर फळी आपटून झालेला आवाज अजूनहि आपल्या कानांत कसा घुमतो आहे ! ह्या आवाजानेंच तर आपण जागे झालों. विचार करीत श्रीपादराव बसते झाले आणि मान टवकारून दाराबाहेरच्या हालचालीचा कानोसा घेऊं लागले.

बाहेरच्या बाजूला गॅलरींत शेजारच्या बिऱ्हाडांतली मुलं जमा झाली होती. तक्रारीच्या सुरांत कुणाविषयीं तरी बोलत होती आणि त्याचवेळीं इथंच खेळायचं कीं खालीं चौकांत जायचं त्याचा आपसांत वाद घालीत होती. श्रीपादरावानी मुलांचे बोलणें लक्षपूर्वक ऐकले आणि उलगडा झाल्याप्रमाणें ते स्वतःशींच हंसले. त्यांच्या लक्षांत आलं कीं शेजारच्या बिऱ्हाडांतल्या बाईने मुलांना बाहेर काढून दरवाजा लावून घेतला असला पाहिजे. घाईघाईत दरवाजा लावतांना फळीवर फळी आपटून फार मोठा आवाज झाला असला पाहिजे. आणि त्याच आवाजाने आपल्याला जाग आली. जाग आल्यावरहि तोच आवाज कानांत घुमत राहिला.



मनाशीं बांधलेल्या अंदाजाचा पडताळा घ्यावा म्हणून श्रीपादराव उठले आणि दरवाजा उघडून गॅलरींत आले. त्यांना पाहून गॅलरींत खेळणारी पोरें जिन्याच्या बाजूनें धांवली आणि पाहतां पाहतां दिसेनाशी झाली. बिऱ्हाडांसमोर पसरलेल्या लांबलचक गॅलरींत श्रीपादराव आतां अगदीं एकटे होते. घाईघाईत त्यांनी शेजारच्या बिऱ्हाडाकडे पाहून घेतले आणि ते समाधानाने हंसले. त्यांचा तर्क बरोबर ठरला होता. शेजारच्या बिऱ्हाडाचे दार बंद होते. दाराशेजारची खिडकीहि बंद करून घेतलेली होती. सहज कुतुहल म्हणून त्यांची नजर बिऱ्हाडाबिऱ्हाडांवरून चालत राहिली आणि मग त्यांच्या लक्षांत आलं कीं प्रत्येक बिऱ्हाडाचं दार लावून घेतलेलं आहे. नेहमी सताड उघडीं असणारी ही दारं ह्या दुपारच्या वेळेला बंद झालेली आहेत. आज सुटीचा दिवस असल्यामुळें पुरुषमाणसं घरीच आहेत. आणि त्यामुळें इतर दिवशीं दुपारच्यावेळीं गॅलरींत पत्ते खेळत बसणाऱ्या बायका आज आपापल्या घरांत आहेत. आवडीच्या माणसाभोंवती रुंजी घालीत आहेत. स्वतःच्या जिवापेक्षां प्यार असलेली मुलं ह्या घटकेला ह्या बायकांना नकोशी झाली आहेत. सुखापोटीं निर्माण झालेली मुलं आतां सुखाआड येऊं लागल्यामुळं अडगळीसारखी वाटूं लागली आहेत. कुणी युक्तीप्रयुक्तीने, कुणी लाडीगोडीने, तर कुणी धाकडपटशा दाखवून मुलांना घराबाहेर काढलं आहे. मोकळ्या हवेवर खेळण्यासाठीं प्रोत्साहन देऊन त्यांना खोलीबाहेर पाठवलं आहे. आणि आतां बिऱ्हाडाबिऱ्हाडांत राजाराणी एकमेकांच्या कौतुकांत दंग झाली आहेत. ह्या कौतुकाच्या नानापरी श्रीपादरावांच्या डोळ्यासमोर सजीव झाल्या आणि ते अस्वस्थ झालें. अप्रिय स्मृतीपासून माणसाने दूर पळावयाचा प्रयत्न करावा तर त्या स्मृतीनीच माणसाच्या पाठीमागें लागून त्याचा पिच्छा पुरवावा तसें श्रीपादरावांच्या बाबतींत झालें. बिऱ्हाडाबिऱ्हाडांतून चाललेल्या सुखसोहळ्याच्या कल्पनेने ते गंहीवरले आणि पाणावलेल्या डोळ्यांसमोर अप्रिय आठवणींचा पूर आला....

...त्याना आठवलें कीं सहा आठ महिन्यापूर्वीं सुटीच्या दिवशीं आपणहि असेच इतरांसारखे वागत होतो. जेवणखाण झाल्यावर कुट-लेल्या सुपारीसाठीं मालतीने चांदीचा छोटा डबा हातात घेतला म्हणजे आपण हलक्या आवाजांत म्हणत होतो, " मालू तेवढा दरवाजा लावून घे बरं " आणि ती दरवाजा लावून घेण्याकरतां वळली म्हणजे आपण घाईघाईत खिडकी बंद करून घेत होतो. बंद खिडक्यादाराआड दुपारच्या वेळीं स्वर्ग उभा रहात होता. एकांतातल्या रुसण्याफुगण्यानें आणि लाडीगोडीनें सुख रंगत होते. पण ह्या सुखाचे रंग पाहतां पाहतां पालटू लागले. फिकें होऊं लागले. मित्र म्हणवणाऱ्या दिगंबरला एका कुमुहुर्तावर घरीं घेऊन आलों. कुणाची कुणाशीं ओळख करून द्यायची त्याचं तारतम्य आपल्याला राहिले नाहीं. झकपक कपडे घालणारा आणि गोड बोलून दुसऱ्यावर छाप पाडणारा दिगंबर मग वेळींअवेळीं आपल्या-कडे येऊं लागला. ' त्याच्यासमोर तुम्ही फारच बावळट दिसतां ' असं एकदां बोलण्याच्या ओघांत मालतीनें म्हटले तेव्हां आपण सावध झालो. पण ही जाग फार उशीरा आली. झोंपेच्या आधीन असताना चोरानी घर धूऊन न्यावे आणि मग केवळ रिकामं घरं पाहण्याकरतां जाग यावी

तसं आपलं झालं. सगळं संपलं होतं. दिव्यातलं तेल संपल्यावर दिव्यानं विझून जावं आणि मागाहून जळक्या वातीची घाण पसरावी तसं घडल्या गोष्टीचं झालं. आयुष्यांतली उभारी नाहींशी करणारी घटना घडून गेली पण कटु स्मृतींच्या रूपानें नेहमीं करतां जिवंत राहिली. मन कुरतडीत आणि शरीर पोखरीत !

घडल्या गोष्टी डोळ्यासमोर उभ्या राहिल्या तेव्हां श्रीपादराव कावरे बावरे झाले. मन गलबलून गेलं. कुठंतरी दूर पळून जावं असं त्यांना वाटूं लागलं. मान हलवून त्यानी डोक्याला हिसके दिले आणि कटु स्मृतीना हुसकावून लावलं. गॅलरीच्या कठड्यावर रेलून ते खालच्या चौकांत पाहूं लागले.

घरांघरांतून बाहेर पडलेली मुलं खालीं चौकांत जमा झाली होती. क्रिकेट खेळण्याचा बेत करीत होती. सामानाची जमवाजमव करीत होती एका बिऱ्हांतून कुणीतरी चार स्टंपा आणल्या, लहानमोठ्या आकाराच्या दोनचार बॅटी जमा झाल्या, आणि एका पोराने चड्डीच्या खिशांतून रबरी चेंडू काढून आपल्यापरीने हवेंत वर उंच उडवला. वर उडवलेला चेंडू झेलण्यासाठीं दोघाचौघानी हात पसरले पण सगळ्यांना फसवून चेंडूने एकदम जमिनीवर टुणदिशीं उडी मारली. चेंडूच्या पाठीमागें पोरें धांवू लागली तेव्हां इतकावेळ स्टंपा ठोकण्याच्या नादांत असलेला मुलगा ओरडला, "अरे, स्टंपा ठोकायच्या आहेत कीं नाहीं ! भराभर सगळीं मुलें त्याच्याभोंवती जमा झाली आणि स्टंपा ठोकण्याचें काम समारंभाने सुरू झाले. पण कितीवेळ झाला तरी स्टंपा उभ्याच राहीनात. पहिला स्टंप उभा रहावा आणि दुसरा ठोकूं लागावें तो पहिला आडवा व्हावा असें वारंवार होऊं लागले. पण पोरें कंटाळली नाहींत. एका जिद्दीनें पुन्हा स्टंपा ठोकूं लागली. असें थोडावळ चालले आणि घड एकही स्टंप उभा राहीना तेव्हां श्रीपादरावांना वाटलें कीं खालीं जावें, मुलांत मिसळावें आणि त्यांच्या खेळाची तयारी करून द्यावी; पण एवढ्यांत एका चलाख मुलाच्या डोक्यांत एक कल्पना चमकली. धांवत पळत जाऊन त्यानें तांब्याभर पाणी आणलें आणि तो ते जमिनीवर ओतूं लागला; पण इतर मुलांनी त्याला अडवलें. गाजरासारखे लाल चेहरे झालेली मुलें पाण्यावर तुटून पडली. पाणी प्यायला मिळावें म्हणून जो तो धडपडूं लागला आणि ओढाताणीत सगळें पाणी जमिनीवर सांडून गेलें. पण त्यामुळेंच स्टंपा उभ्या राहिल्या. स्टंपा उभ्या राहिलेल्या पाहून, क्षणापूर्वी पाण्यासाठीं झगडणारी मुलें सगळें विसरून एक झालीं आणि टाळ्या वाजवून आपला आनंद व्यक्त करूं लागली. आनंदाच्या भरांत एका मुलानें, कुणीतरी फेंकून दिलेली दांतवणाची काडी वर उचलली आणि स्टंपांच्या डोक्यावर ठेवून दिली. पाहतां पाहतां खेळाची पूर्वतयारी पुरी झाली. मोठ्या मुलांचा आव आणून भिडू वाटले गेले, ओली सुखी झाली आणि दोन चुटचुटीत मुलें बॅटी सरसावून पुढें झालीं.

इतका वेळ केलेल्या धडपडीचे सार्थक झाले होते. खेळाचा पसारा मांडून आतां खेळाला सुरवात झाली होती. बॅट बॉलची गांठ पडूं लागली होती. उशी घेऊन चेंडू पळत होता आणि त्याला पकडण्यासाठीं मुलें धांवत होती. धांवा काढणारी जोडी शर्थीनें पळत होती. पळता पळता एखाद्याचा पाय घसरत होता. पण ताबडतोब तोल सांवरला जात होता आणि पुन्हा धांवायला सुरवात होत होती. खेळ आतां खरोखरच रंगात येऊं लागला होता. मुलांच्या बरोबर श्रीपादरावही रंगात आले होतें. स्वतःचे दुःख विसरून त्यांच्याबरोबर टाळ्या पिटूं लागले होते. मध्येंच ओरडून मुलांना शाबासकी देऊं लागले होते. धडपड करून खेळ आकारास आणणाऱ्या मुलांचे कौतुक करूं लागलें होतें.

पण ध्यानीमनी नसतांना खेळाचे पारडे एकदम फिरले. कुठें तरी कांहीं तरी बिनसलें. स्टंपा जागेवरच राहिल्या, बॅट कुठें तरी पडली, चेंडू एका बाजूला घरंगळत गेला आणि इतकावेळ रंगांत येऊन खेळणारी मुलें डाव अर्धवट टाकून एका पाठोपाठ धांवू लागली. असें एकदम काय झालें ते श्रीपादरावांच्या लक्षांत येईना तेव्हां खालीं वाकून शोधक नजरेनें ते पाहूं लागले...

दूरच्या कोपऱ्यांत एका झाडाखालीं एक हातगाडी येऊन उभी राहिली होती. हातांतल्या दोरीला हिसके देऊन हातगाडीवाला जोरजोरांत घंटा वाजवीत होता आणि मुलांकडे पाहून, 'आओ बच्चो ! आओ बच्चो !' म्हणून पुकारा करीत होता. मुलें वेड्यासारखी गाडीच्या रोखानें धांवत होती. दाटीवाटी करून गाडीभोंवती कोंडाळे करीत होती आणि गाडीवरच्या रंगीबेरंगी बाटल्यांकडे जिभल्या चाटीत पहात होती. किसणीवरती बर्फ किसला जाऊं लागला तेव्हां मुलें स्वतःला विसरली, क्षणभरापूर्वीं खेळत असलेल्या खेळाला विसरली, खेळांतल्या सामानाला विसरली. बिचारें क्रिकेटचें सामान हिरमुसलें झालें. जागच्या जागेवर पडून खंत करीत राहिले.

आणि हें सारे पाहून इतका वेळ स्वतःला विसरलेले श्रीपादराव एकदम भानावर आले. जुने दुःख जागे झाले आणि पुन्हा ते अस्वस्थ झाले. धडपड करून मांडलेला डाव अर्धवट टाकून रंगीबेरंगी गोष्टींच्या मागें धांवणाऱ्या मुलांकडे क्रुद्ध नजरेनें पाहूं लागले. आणि मुलांकडे पाहतां, पाहतां जमिनीवर मरगळल्याप्रमाणें पडलेले खेळाचे सामान दृष्टीस पडले तेव्हां त्यांना एकदम भडभडून आले... • •








(पान २२ वरून चालू)

गांवांत कुठेहि एक कपभर चहा विकत मिळत नव्हता. एकहि सिनेमागृह नव्हते. कधींमधीं राजाच एकादा सिनेमा विद्यार्थ्यांना दाखवी. तो कार्यक्रम जगदंबेच्या देवळांत व्हायचा. परदेशांत छोटे छोटे शास्त्रविषयक बोलपट निर्माण होत असत. राजा ते मागवून घेई आणि राजकुटुंबीय मुलांबरोबर सर्व शाळकरी मुलांना दाखवी. कधीं कधीं राजा दूरच्या प्रवासाला जाई, त्या प्रवासाचे चलचित्रपट तयार करवी आणि तेहि जगदंबेच्या मंदिरांत आम्हांला दाखवी. चलचित्रपटाची सर्व साधनसामुग्री तेवढ्यासाठीं त्यानें खरेदी केली होती. चित्रपट घेणारे कारागीर पदरीं बाळगले होते.

एकदां राजा आमच्या शाळेंत आला. अगदीं अचानकपणें आला. शाळेच्या मुख्याध्यापकांना वाटले शाळेंत चालू असलेल्या धंदे-शिक्षणाची, धार्मिक शिक्षणाची प्रगति अजमावण्यासाठीं राजा आकस्मिक आला असेल. आमच्या शाळेंत त्या काळांतहि सूतकताई, मातकाम, शेतकी, विणकाम हे विषय शिकवले जात होते. शिक्षक-मंडळींना ते सारे फॅड वाटे पण राजहट्टापुढें त्यांचे कांहीं चालत नसे. राजा आला तो नेमका आमच्या वर्गात आला. मी त्यावेळीं इंग्रजी सहाव्या इयत्तेंत होतो. राजा येतांच आम्ही सर्व खडबडून उठून उभे राहिलों. राजा एका विद्यार्थ्यापुढें आला. अगदी प्रेमळ आवाजांत त्यानें त्या बावरलेल्या विद्यार्थ्याला विचारले...

'तुमच्या वर्गांत पहिला तास कसला असतो ?'

'नमस्काराचा' विद्यार्थी उत्तरला.

'छान, दुसरा ?' राजानें विचारले.

'गीतापठनाचा'

'गीतेंतले कुठले वचन तुला सर्वांत अधिक आवडते ?'

'कर्मण्येंवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन'

ही सर्व उत्तरें ठरलेली होती. ते प्रश्न विद्यार्थ्यांना माहित होते. त्यांची काय उत्तरं दिलेली राजाला आवडतात हेहि त्यांना पाठ होते. आणि हें सर्व स्वतः राजाहि जाणत होता. त्यादिवशी त्यानें एक वेगळाच प्रश्न एका विद्यार्थ्याला विचारला.

'तूं पुढें कोण होशील ?'

या प्रश्नानें मात्र तो विद्यार्थी चपापला. त्या विद्यार्थ्याला उत्तर देणें जमले नाहीं. मग तो प्रत्येक विद्यार्थ्याला हाच प्रश्न विचारूं लागला. वर्गशिक्षकाच्या माथ्यावर घाम जमा झाला. एक विद्यार्थी धीर करून म्हणाला—

'मी कलेक्टर होणार,' राजानें नाक मुरडले.

एकजण बोलला 'मी मुन्सफ होईन.'

राजाच्या रुंद कपाळावर आठ्यांचे जाळे जमले. कुणाच विद्यार्थ्याला कळेना कीं राजाला काय उत्तर द्यावे म्हणजे त्याला बरे वाटेल.

'तूं रे ?' आणखी एका मुला राजानें विचारले.

'मी बांगड्याचा कारखाना काढणार.'

मग कुठें राजाच्या चेहऱ्यावर समाधान झळकले.

'तुझे नांव ?'

'ज्ञानू विठू कासार.'

'शाब्बास,' राजानें त्याची पाठ थोपटली, 'तूं मॅट्रिक पास झालास म्हणजे माझ्याकडे ये. मी तुला भांडवल देईन कारखाना काढायला.'

त्या कासाराच्या मुलाला आश्वासन देऊन राजा आला तसाच निघून गेला. माझ्यावर प्रश्नाची पाळीच आली नाहीं. मीहि असेच कांहीं तरी उत्तर दिले असते आणि भांडवल मिळवले असते. त्यानें तसें भांडवल कैकांना दिले होते. म्हणूनच त्या छोट्याशा संस्थानांत किर्लोस्करांचा लोखंडाचा कारखाना होता, ओगले ग्लास वर्क्स, भरभराटींत होती. 'वॉशेक्स' आणि 'ग्लिसरीन' या साबणानीं बाजारपेठेंत नांवे कमविली होती. सुगंध शाळेचे धूप मशहूर होते. श्रीनिवास मेटल वर्क्सच्या वस्तू बाजारांत दिसत होत्या. आपले छोटेसे संस्थान एक औद्योगिक वसाहतच होऊन जावे अशी राजाची मनीषा होती. आणि त्यासाठीं इष्ट ते सर्व करण्याची त्याची तयारी होती.

या अनाहूत प्रसंगीहि राजाशीं जवळीक करणें मला जमले नाहीं. मीं राजाला अनेकदा पाहिले जवळून पाहिलें. त्याची भाषणें ऐकली. त्याचा वाडा पाहिला. वाड्यांतील राजकुमारांशीहि माझे परिचय झाले. पण राजाच्या कृपेस पात्र होण्याची संधी मला लाभता लाभेना. फ्री बोर्डिंगवाल्या मुलांना सणासुदीचे जेवण राजवाड्यांत मिळत असे. एकदा अशीच पंगत बसली होती. वाढपी वाढत होते. थोरघरीं आल्यामुळें आम्ही सर्वजण संकोचून बसलों होतों. संकल्प सोडण्यासाठीं म्हणून राजा पंगतींत आला. मोठ्या मोठ्या डोळ्यांनीं त्यांनीं आमच्याकडे पाहिले आणि खाजगी कारभाऱ्यांना उद्देशून तो एकदम ओरडला—'या मुलांच्या पंगती आंत आमच्या समोर घ्या.' खाजगीकडेच सारे नौकर धावरले. आम्ही पटापट आमच्या जागांवर उठून उभे राहिलों. आमची पंगत आंत गेली आणि आंतली पंगत बाहेर आली. राजाच्या पंगतीला जेवायला बसल्यावर आमच्या लक्षांत आले कीं राजानें ही अदलाबदल कां केली. आपल्या पंगतींत पक्वान्नें वाढली होती, तर बाहेरच्या पात्रांवर साध्या पांढऱ्या पोळ्याच होत्या. ती विषमता राजाच्या स्वभावाला मानवली नव्हती. तो बोलला कांहींच नाहीं फक्त गुरकावल्यासारख्या आवाजांत तो म्हणाला, 'इथून पुढं आमची बाळं आमच्याच पंग-तीला जेवली पाहिजेत.' खाजगीकडल्या नौकरांनीं नंदी बैलासारख्या मुंड्या हालवल्या. विद्यार्थ्यांना राजाच्या पंगतीचा लाभ मिळाला आणि राजाचे नित्याचे पंगतीपठाण मात्र हिरमुसले झाले.

राजाच्या पंगतीला आमच्या पुढ्यांत गोडधोड जेवण येऊं लागले पण ते अन्न आम्हांला मानवेनासे झाले कारण जेवतांना राजा आमच्याशीं बोलूं लागला पण त्याच्याशीं बोलणें आम्हांला जड होऊं लागले. राजा एकादा संस्कृत श्लोक म्हणे व त्याचा अर्थ एकाद्या मुलाला विचारी. ज्याला अर्थ विचारला असेल त्याला हपका बसे आणि त्याच्या खालचा आपला हात उगीचच आखडता घेई. पुढें पुढें भोजन गृहांत एक फळा ठेवला जाऊं लागला. त्यावर रोज एक नवा श्लोक लिहिला जाई व स्वतः राजाच त्या श्लोकाचा अर्थ विषद करून सांगे. राजाच्या भोजनगृहाला आम्ही विद्यार्थी आपसांत भोजनशाळा म्हणूं लागलों. इतके झाले तरी राजाची दृष्टि आपल्यावर वर्षवून घेण्याचें माझे इप्सित कांहीं साधले नाहीं. ती संधी गणेशो-त्सवाचे वेळीं आली. गणेशोत्सव हा राष्ट्रीय उत्सव. जगदंबेच्या

अनुक्रमणिका

नवरात्र मंडपांत मोठ्या धडाक्यानें साजरा केला जाई. नाटकें, नृत्यें, करमणुकीचे कार्यक्रम चार चार दिवस चालत. त्या उत्सवांत आम्ही सहावीच्या विद्यार्थ्यांनीं अत्र्यांचे गुरुदक्षिणा नाटक बसविलें. मी त्यांत वक्रदंताची विनोदी भूमिका करत होतो. नाटकाचा प्रयोग बघायला राजा आला. वक्रदंताच्या व ऋषीकुमाराच्या प्रवेशांत तो एकाद्या लहान मुलासारखा खदखदून हंसला. दोनचारदां 'वाहवा वाहवा' असें ओरडून त्यानें टाळ्या पिटल्या. माझें कैक वर्षांचें इप्सित सिद्ध झालें.

उत्सव संपला. राजाच्याच अध्यक्षतेखालीं बक्षिस समारंभ सुरू झाला. आम्हांला आधींच बातमी लागली होती कीं शाळेच्या बक्षिसाव्यतिरिक्त कांहीं विशेष बक्षिसे स्वतः राजानें देऊं केली आहेत. त्यांत माझें नांव असणारच याबद्दल मला खात्री होती. विशेष बक्षिस जिंकलेल्या विद्यार्थ्यांची नांवें जाहीर करण्याची वेळ आली. तेव्हां माझे पंचप्राण कानाच्या पडद्या आड येऊन थांबले. पहिलें नांव वांचले गेले ते गोखले नांवाच्या एका विद्यार्थ्याचें. त्यानें सुदाम्याची भूमिका केली होती. तो पोरगा अगदी पाप्याचेपितर होता. आपल्या मोठमोठ्या डोळ्यांनीं त्याच्याकडे रोखून पहात राहिला. गोखल्यानें बक्षिस स्वीकारलें. राजा त्याला गंभीरपणें म्हणाला—“ बाळ, हें बक्षिस अभिनयाचें. अभिनय चांगला केलांस, पण...” राजाच्या तोंडच्या पणामुळें गोखल्याच्या तोंडचें पाणी पळालें. आम्हीहि ऐकूं लागलों. राजा त्या सुदाम्याला उद्देशून म्हणाला—“ औंध संस्थानांत सुदाम्याचे काम करण्यासाठीं एकादा विद्यार्थी सांपडावा याचें आम्हांला फार वाईट वाटतें. पुढच्या वर्षी याच नाटकांत तुम्हीं बलरामाची भूमिका केली पाहिजे. ” कुणीहि टाळ्या दिल्या नाहींत. सुदामा घामाघूम होऊन आपल्या जागेवर येऊन बसला. राजाला शरीरसौष्ठवाबद्दल अत्यंत प्रेम होतें. आतां दुसरें बक्षिस बलरामाचें काम केलेल्या विद्यार्थ्याला मिळणार याबद्दल खात्री होती, पण तसें घडलें नाहीं. यादी वाचणाऱ्या शिक्षकानें माझें नांव पुकारलें आणि माझ्या मनोरथाचे घोडे गंगेंत न्हाले. मी दोन्हीं पायावरउठून उभा राहिलों आणि राजा खो खो हंसूं लागला. त्याला सारें माझें नाटकांतील काम आठवत होतें. मी जवळ जातांच त्यानें माझ्या हातावर बक्षिस ठेविलें आणि जोरानें माझी पाठ थोपटली. जिंकलेल्या पैलवानाचा दंड धरून त्याला फडांत फिरवतात तसा राजानें माझा धरला आणि लोकांना उद्देशून तो म्हणाला—' हा मुलगा हास्याचे डोंगर उत्पन्न करील. बाळ तूं टाकींत जा. शिकला नाहींस तरी चालेल.” त्यानें मला सांगितलें. टाकींत म्हणजे बोलक्या सिनेमांत इंग्रजी शब्द जाणून बुजून अशुद्ध उच्चारण्याची लकब राजाला होती.

राजाज्ञेप्रमाणें मी शिकलों नाहींच, टाकींत गेलों. मधल्या काळांत राजानें आपल्या राज्यांत असंख्य सुधारणा केल्या, भारताला स्वातंत्र्य मिळण्याच्या आधींच आठ वर्षें त्यानें आपल्या प्रजाजनांना स्वातंत्र्य बहाल करून टाकलें. औंध संस्थानांत निवडणुकीची धमाल उडाली. राजाचा एक मुलगा परदेशांतून बॅरिस्टर होऊन आला होता. त्यानें अगदी राजाच्या हातावर हात मारला. त्यालाच जनतेनें संस्थानी राज्याचा मुख्य प्रधान केला. राज्य कारभाराची घटना राजानें खुद्द महात्मागांधींच्या सल्ल्यानें तयार करून आणली होती. मधल्या चारपांच वर्षांत मला राजदर्शन घडलें नाहीं. मी कोल्हापूर संस्थानांत होतो. संस्थाना संस्थानांतला फरक पाहात होतो.

एकदा असाच महाद्वार रस्त्यानें जगदंबेच्या दर्शनाला मी चाललों होतो. एक मोटर माझ्या बाजूला अचानक थांबली मी वळून पाहिलें तों ' औंधाचा राजा ' राजाचे शब्द माझ्या लक्षांत होते. त्याचे उपकार मी विसरलों नव्हतों. राजाच्या पायाला हात लावण्याची इच्छा माझ्या मनीं उमाळून आली, त्यापूर्वींच राजानें मोटरचें दार उघडलें आणि माझ्या पाठीवर थाप मारली. तो मला विसरला नव्हता. म्हणाला—' बाळ, तुमची प्रगति आम्ही ऐकतों आहे. आनंद वाटतो. आपल्या संस्थानचें नांव असेंच उज्वल करा, जगदंबा तुम्हांला उदंड आयुष्य देईल. ”

राजा निघून गेला. त्यानें सांगितलेल्या मार्गानें मी चालत राहिलों. भली बुरी प्रगति करत राहिलों. बेचाळिसच्या लढ्यांत साताऱ्याच्या क्रांतिकारकांना आसरा मिळाला तो औंध संस्थानांतच. त्याला इंग्रजाचें राज्य कधींच आवडत नव्हतें. त्याची निष्ठा होती छत्रपती शिवाजी महाराजांवर तो स्वतः कीर्तन करी, त्या कीर्तनाची सर्व कथानकें त्यानें शिवचरित्रावरून गुंफली होती. स्वावलंबनाचा उपदेश तर तो आपल्या प्रजाजनांना सदैवच करत असे. बलोपासना हा तर त्याच्या प्रगाढ निष्ठेचा विषय होता. त्यानें आयुष्यभर कधींहि परदेशी कपडा वापरला नाहीं. परदेशी वस्तू वापरली नाहीं. परदेशीवस्तू विरुद्ध तो एका सभेंत बोलत असतांना त्याच्याच शिक्षणानें सुज्ञाण झालेल्या एका नागरीकानें त्याला खडसावून विचारलें होतें—” मग महाराज मोटर कशीं वापरतां ? अमोघ वक्तृत्वाबद्दल प्रसिद्ध असलेल्या राजाची जीभ त्या प्रसंगीं चाचरली होती. त्याचे डोळे दहिंवरले होते. साद गहिंवरला होता. त्या प्रजाजनाला त्यानें उत्तर दिलें होतें...“ माझ्या संस्थानचा मुलूख इतस्ततः पसरलेला आहे. एक तालुका सोलापुराजवळ तर दुसरा विजापूर हद्दींत वेगवान वहान नसेल तर माझ्या संस्थानच्या



“ आंता खिशांतला हात तेवढा काढा ! ”

प्रत्येक खेड्यांत जाणें मला अशक्य होईल. पुनः पुन्हां माझ्या प्रजाजनांची गांठ पडणार नाहीं. नाईलाजानें मी हें परदेशी वाहन वापरत आहे. यंत्रे आणि औषधें या बाबतींत आपण दुबळे आहोंत. त्या बाबतींतहि हा देश स्वावलंबी झाल्याचें पाहण्यास परमेश्वरानें आम्हांला आयुष्य द्यावें. ''

१९४७ सालीं देश स्वतंत्र झाला. राजाचे डोळे कृतार्थ झाले. साऱ्या संस्थानभर महोत्सव साजरे केले गेले. पुढें दोन वर्षांतच राजाला आपले राज्यहि भारतीय प्रजेच्या स्वाधीन करावे लागले. कृतार्थ राजयोग्यासारख्या त्यानें त्या घटना आनंदानें पाहिल्या. हे आनंदवनभुवन त्याच्या समर्थ डोळ्यांनीं फार पूर्वीं पाहिले होते. त्याच्या निर्मितीसाठीं करतां येतील तितके प्रयत्न विधायकपणें केले होते.

त्यावेळीं मी पुण्याला होतो. नुसता नाममात्र राहिलेल्या औंधाचा राजा पुण्याला आला होता. पंताच्या गोटांतील आपल्या जुनाट बंगलींत त्याचे वास्तव्य होतें. मी दर्शनाला गेलों. राजदर्शन होतांच चरकलों. राजा आतां खरंच म्हातारा दिसूं लागला होता.

" या —'' राजानें माझें स्वागत केलें. अनंत विषयावर तो माझ्याशीं बोलला. अगदीं मनमोकळे बोलला. जणूं मी त्याच्या कुटुंबा-पैकींच एक होतो. संस्थानांतून बाहेर पडलेल्या प्रत्येक माणसाबद्दल त्याला पुरेपूर माहिती होती. मी काय करतो आहे, कसा नांदतो आहे हेहि त्याला माहित होते.

" शिवाजी महाराजांच्या आयुष्यावर चांगलें चित्रपट कां काढले जात नाहींत ? '' राजानें विचारलें.

" त्याला स्वतःची चित्रसंस्था पाहिजे. '' मी म्हणालों.

" तिला किती खर्च येईल ? ''

त्यावर मी एक आंकडा सांगितला. तो ऐकून राजा गंभीर झाला. बोलला कांहींच नाहीं थोडा वेळ गप्प राहिला. त्याच्या मनांतील विचार मी ओळखूं शकलों. त्याला वाटत होते, ' संस्थानांत उदयाला आलेल्या अनेक उद्योगांना माझा हातभार लागला, ह्याच्या उद्योगांत मात्र मी सहाय्यभूत होऊं शकत नाहीं. कारण मी आतां राजा राहिलों नाहीं. ' तो त्या विषयावर पुनः बोलला नाहीं. माझ्याबद्दलचं बोलत राहिला. माझा ' रामजोशी ' हा बोलपट त्याला फार आवडला होता. कीर्तन, लावण्या, नाटक, तमाशा या साऱ्याच कला प्रकाराबद्दल राजाला मनापासून आस्था होती. रामजोशीच्या कथानकांतील एक चूक मात्र त्यानें मला सांगितली. तो म्हणाला—" उत्तर पेशवाईंतील तमाशांत बायका नाचत नसत. नाच्ये पोरे असत. आणि खरंच बोलायचं तर तमाशांत नाच्येच चांगले दिसतात. ''

मग मी राजाला माझ्या एका चित्रपटासाठीं आमंत्रण दिलें. तो आनंदानें आला. चित्रपट पौराणिक होता. राजाला पुराणांचे प्रेम. संस्कृतसाहित्याचें प्रेम. रामायण महाभारण हे तर त्याचे अत्यंत आवडते ग्रंथ. त्या चित्रपटाची कथाहि रामायणावरचं आधारलेली होती. चित्रपटांतील वातावरण, कथेची घडण, त्यांतले काव्य सारेच राजाला आवडले. तें चांगलें होते म्हणून त्याला आवडले कीं ते मी लिहिलें होते—त्याच्या एका प्रजाजनानें लिहिले होते म्हणून त्याला पसंत पडले कोण जाणे. चित्रपट संपल्यावर त्याने मला छातीशीं धरले. गहींवरून बोलला ' बाळ, तुम्ही आपल्या संस्थानचे नांव उजळलेत ! '

राजानें राज्य सोडलें होते, पण औंधच्या भूमीचे प्रेम आणि तिथल्या प्रजाजनांचे कौतुक त्याच्या विशाल छातींत पूर्वीं सारखेंच हेलावत होते.

अगदीं शेवटीं मी राजदर्शनाला गेलों. तो दिवस संक्रांतीचा होता. मी गेलों. पंताच्या गोटांतीलच कथा. राजाला आनंद झाला. तो आतां खूप थकला होता. सचिंत वाटत होता.

मी पायांना स्पर्श करून त्याला नमस्कार केला.

' जय देव ! ' राजा बोलला. एवढ्यांत कुणी तरी आंत आले. ते राजाचे व्याही होते. त्यांना ' बसा ' म्हणायच्या आधींच राजानें त्यांची माझी ओळख करून दिली.

राजा बोलला, ' हा आमचा मुलगा, औंधाच्या शाळेंत एवढासा होता. आतां मोठा झाला आहे. नांव कमावलं आहे. आमच्या बोर्डिंगांत होता. जगदंबेच्या परडींतलं अन्न खाल्लं आहे. त्याचं त्यानं स्मरण ठेवलं आहे. '

राजाला मान देण्यासाठीं पाहुण्यांनी मान डोलावली. राजा गप्प झाला. बराच वेळानें बोलला, ' सर्वच गणितं बरोबर येत नाहींत कांहीं चुकतात ' व्याह्यांना त्याचें म्हणणें समजलें नाहीं. राजघराण्यां-तील मुलामुलींबद्दलच्या अपेक्षा, राजाला वाटत होते तशा फलद्रुप झाल्या नव्हत्या. त्याला कांहीं तरी अबोध दुःख होते.

मी निरोप घेऊन निघालों तेव्हां राजा स्वगत बोलावें तसा बोलला.

' बरं वाटतं अशी मुलं भेटली म्हणजे. आतां कांहीं मी राजा राहिलों नाहीं पण बाप आहे. मुलांनीं भेटावं असं वाटतं.

मला अश्रु आवरणें कठिण झाले. मान खालीं घालूनच मी गोटां-तून बाहेर पडलों.

बस्स. त्यानंतर पुनः मी राजाला पाहिलें नाहीं. औंधाचा राजा गेला. मनूच्या परंपरेंतील शेवटचा पुरुष गेला.

परवां, ' दो आँखे बारह हाथ ' या मी लिहिलेल्या चित्रपटाला राष्ट्रपतीचे सुवर्णपदक मिळाले. त्या चित्रपटाची कथा मला औंध संस्थानच्या परिसरांत सुचली होती. औंधाच्या राजानेंच तो अद्भूत प्रयोग करून पाहिला होता. ' मॉरिस फ्रीडमन ' नांवाच्या एका आयरिश तरुणाच्या सूचनेवरून गुन्हेगारांना उघड्या वस्तींत ठेव-ण्याचा प्रयोग औंधकरांनीं केला होता. ती संस्था अल्पशेष्र अवस्थेंत अजून आहे. माझ्या गांवाजवळच आहे. तिंथल्या खुनी कैद्यांनीं मला सांगितलें होते ' वेड्या काढतांना राजानें आम्हांला जगदंबे-समोर नेऊन, शपथा घेववल्या होत्या ! माझ्या चित्रपटांत या देवाच्या धाकाचाच मी उपयोग केला होता. माझ्या उद्योगाला राजाचे साहाय्य अशा तऱ्हेनें झालें—राजाच्या हयातीनंतर झालें.

' दो आँखे बारह हाथ 'च्या यशाचे अभिनंदन करणारें एक पत्र मला आले. ते औंधाच्या राजाचें थोरले चिरंजीव बॅ. अप्पासाहेब पंत यांनीं सिक्किमहून लिहिले होते. त्यांनीं लिहिले होते...

तुझें अभिनंदन करूं कीं कौतुक ? गुन्हेगारांना माणुसकीनें वागविण्याचा हा प्रयोग माझ्याच एका मित्राच्या सांगण्यावरून बाबांनीं केला होता. आज बाबा असते तर... '

पुढचीं अक्षरें मला वाचवेनात. कितीतरीं वेळ डोळे नुसते गळतच राहिले !

• • •



# गोमंतीची सांस्कृतिक पदचिन्हें : ३





— गोपाळकृष्ण भोबे

## ना द ब्र ह्म

वैशाखाला सुरुवात झाली कीं वसंतोत्सवांत मग्न असलेलें लोक ती धुंदी झटकून मोकळे होत, आणि पुन्हा प्रपंचाच्या रहाटगाडग्याकडे वळत असत. कडधान्य सुकवून पुरवठ्याकरितां बंदिस्त करून ठेवायचे असे, उडदांचे पापड, कोहळ्याचे साणगे, नारळाचे खोबरें, लालमाती लावलेल्या फणसाच्या बिया, लाल कांद्यांच्या माळा, लाल चवळी सारें सगळ्या मुमुक्षुंच्या दारांत पातळलेलं असे; हें सगळें सुकवून डब्यांत भरून ठेवलं न ठेवलं तों दुसरं काम दत्त म्हणून पुढें असे. दारांत असलेल्या गवताच्या गंज्या मोडून तें गवत गोठ्यांतल्या माळ्यावर भरून पुरवठ्याकरितां गच्च भरून ठेवण्याची चढाओढ असे. ज्यानें पहिलं उरकलं तो दुसऱ्या घरीं मदतीला जाई. एवढं सरतं न सरतं तोंच शाकारणीचें काम चालू होई, शाकारणी संपली कीं शेतांतली नांगरणी सुरू होई. बांधावरून जातांना, जमिनीच्या भाजणीचा उग्र वास दरवळून राहिलेला नाकाला झोंबे. आमरसाचा वेलची जायफळ घातलेल्या हलव्याचा वास गांवभर दरवळल्यासारखा वाटे. तोही पुरवठ्याचाच एक भाग होता. आणि ज्याच्या स्वागताकरितां ही सारी तयारी होती तो पर्जन्यराजा जूनच्या सात तारखेला अगदीं न चुकतां येई.

हें सगळें कसें तालांत चाललेलें असे. भावनातीत श्रद्धेनें चाललेलें असे. या साऱ्या प्रपंचगायनाला निसर्गाचीहि तालबद्ध साथ असे. मृगाचा पाऊस, आर्द्राचा पाऊस, पुनर्वसूचा पाऊस, नेटका पडे. कमी नाहीं जास्त नाहीं.

ओंपणी व्यवस्थित होई, नडणी व्यवस्थित होई. लावणीसुद्धां व्यवस्थित झाल्याचें हास्यमुखानें ऐकूं येई.

दारांतल्या सातपानी भेंडीला फूल दिसलं, कीं श्रावणाची चाहूल लागे. शेताचें काम आतां संपलेलें असे ! मत्स्यावताराची कृपादृष्टि झाल्यानें रांपणीलाहि मासळी चांगली पडल्याचें ऐकूं येई. मासळी तऱ्हेतऱ्हेची पडे. आतां पुढें व्रतांचा राजा श्रावण येणार म्हणून आडवा उभा हात त्याच्यावर मारला जाई.

रातकिड्यांच्या किर्र आवाजांत आषाढाची अमावस्या संपून जाई. आणि हास्याचा पाऊस घेऊन श्रावण उजाडे.

असाच एक श्रावणांतला दुसरा सोमवार. कृष्णजन्माच्या चाहुलीचीं पावलें उमटूं लागलीं आहेत. यंदाचं पिक चागलंच येणार याची खात्री प्रत्येकजणाला आहे. भावी यशाच्या कल्पनेच्या आनंदाची प्रत्येकजणाला जाणीव होऊं लागली आहे. दिवसभऱ्यानें श्रमलेला व्रतस्थ जीव उपास सोडून नुकताच कुठें ओव्यावर विसावा घेतो आहे. रात्र शांत आहे, चंद्र धूसर आहे, तोंच गांवातल्या चर्चची घंटा आठाचे ठोके देते. त्या विशाल घंटेचा नाद वातावरणांत विरतो न विरतो तोंच शेजारच्या घरांतून लयबद्ध बोल ऐकूं येतो. किटतक् ताक् धी । धित्ताधी, किटतक् ताक् धी । धित्ताधी । धिक् तथैयता किटतक् ता धी धी, ता धीधीता, धी धी ता

कांबळ्यांत बांधून खुंटीवर अडकवलेलें ' कुटू नायकाचे ' ' घुमट ' आतां सुटलेलें आहे. दोरी आवळून त्यानें चामडं चढवलेलें आहे. शेजारच्या गोठ्यांतल्या शेकोटीवर त्याला उबवलेलें आहे. आतां महिनाभर तरी त्याला सुट्टी घेतां येणार नाहीं. नायकाचे शिष्यगण भोवतीं बसलेले आहेत आणि तो त्यांना निरनिराळे बोल सांगतो आहे. टाळीनें ते ताल देताहेत आणि बरहुकूम बोल समेवर येतो आहे. आतां अष्टमीचे रात्रीं बरोबर बारा वाजतां त्यांची परीक्षा व्हायची आहे.

आणि रात्रीं बरोबर बारा वाजतां विजा चमकताहेत, मधून मधून गरजतें आहे, धो धो पाऊस ओततो आहे अशा वेळीं कुटू नायकाच्या घरीं वाद्यमेळाच्या झणत्कारांत धिम्या त्रितालांतल्या दशावतारी आरतीची सुरुवात होई.

" अहो ! आरती सप्रेम जयजय
विठ्ठल परब्रह्म ऽऽऽ ! "

आणि सप्रेम मधल्या प्रेमावर प्रेमांत येऊन मारलेला एक जबरदस्त त्रिपल्लींतल्या मुखड्याबरोबरच पडण ऐकूं यायचें,

धित्ता ता ता । धित्ता ता ता किट धित्ताता ता ।

हातांत हात घालून तालांत पावलें टाकणाऱ्या निसर्ग आणि मानवाची ही गोष्ट 'शुर्पारकांच्या' किंवा ' वाकाटकांच्या ' काळांतली मुळींच नव्हे. ती गोष्ट पंचवीस वर्षांपूर्वीची आहे.

दुसऱ्या महायुद्धानें सर्व बाबतींत आम्हाला बेताल करून सोडलेलें आहे.

जूनच्या सात तारखेला आतां पाऊस पडत नाहीं, जन्माष्टमीच्या दिवशीं बाराला पाऊस तर नाहींच; पण केव्हां केव्हां सबंध महिनाच पावसाचे बारा वाजलेले असतात. इथें कांहीं कांहीं ठिकाणीं तर आपपल्या सोईप्रमाणें कृष्णजन्म सायंकाळींहि उरकून श्रद्धेचेहि बारा वाजलेले आहेत.

सारांश आमच्याबरोबर निसर्गहि बेताल झालेला आहे. हें कटुसत्य आहे ! असो !

कृष्णजन्माष्टमीच्या उत्सवाला घुमटानें घातलेलें हें नमन अनंत चतुर्दशीपर्यंत वाढत्या

अनुक्रमणिका

श्रेणीनें निनादत राहतें. गणपतीच्या दोन्हीं वेळेच्या आरत्या याच साजावर गांवभर वाजवल्या जातात.

या निमित्तानें कांवळ्यांतून सोडवलेलें घुमट पुढें शिमगोत्सव येईपर्यंत शिकवण्याच्या निमित्ताने, बरोबर इतर साज नसला तरी वाजतच राहतें; परंतू शिमग्याच्या पुनवेंतल्या रोम्बटाच्या उत्सवांत मात्र त्याला चार दिवस विश्रांति मिळते. कारण रोम्बट म्हणजे धांगडधिंगा असतो. तरीपण तो तालांत असतो. रोम्बटाच्या वाद्यांचा साजहि तसाच मोठा दोन डब, डब म्हणजे एका तोंडानें वाजणारे, दोन ढोल, दोन किंवा तीन ताशे, एक मोठें कांसाळें आणि ट्रॅंगल असा त्याचा साज असतो. असें हे जरी रणवाद्य असलें तरी लयकारी हा जो गोमंतकांतल्या वादन कलेचा प्राण तो त्यांत असतोच.

तीन दिवसपर्यंत रोम्बटाचा उत्सव असतो. तिसऱ्या दिवशीं ‘धुळपेठ’ असते. ह्या दिवशीं रोम्बट अगदीं कळसाला पोंचलेलें असते. आबालवृद्धांची एकतानता साधलेली असते. ह्या दिवशीं ढोलाचीं आणि डबांचीं चामडीं पुन्हा एकवार वडाच्या चिकाचा बॉण्ड घालून (जशी तबल्याला शाई) अस्सल तुपाने रगडून चढवलीं जातात त्याची विशिष्ठ घुमी-तज्ञांकडून तपासली जाते. या दिवशी सोम्या-गोम्या ढोलाच्या काठीला हात लावित नाहीं. दमनाला गांवच्या जाणत्या माणसानें एक गत म्हणायची आणि समेच्या अक्षरावर दोन वेळां ट्रॅंगलवर सम पकडली, कीं सारा साज एकाच वेळीं तिय्या घेऊन समेवर आदळतो त्यावेळीं नादानें आणि उन्मादानें नाचणाऱ्या साऱ्या जमावाकडून होऽऽ असा आवाज उठतो आणि पुढें सुतासारख्या लयींत गत सुरू होते अन् त्या गतीवर सारा जनसंमर्द बेहोष होऊन नाचत असतो. नाचाच्या रंगांत आलेल्या ह्या लोकांना थोडेसें सोमरसानेंहि रंगांत आणलेलें असलें तरी लयीची आस कमी झालेली मात्र त्यांना बिलकुल सहन होत नाहीं. वाद्यसमूहांतला एखादा वादक लयीचा कच्चा असला तर त्याची कंबख्तिच ओढवते.

रोम्बटाचा हा उत्सव संपला, कीं तालय्ये ज्ञाते आणि त्यांच्या रसिक श्रोत्यांच्या हृदयांत नादब्रह्माचा साक्षात्कार घडवणाऱ्या ‘स्वारी’-चा उत्सव सुरू होतो. आणि घुमटावरचें खरें कसब दिसतें तें इथें.

‘स्वारी’ म्हणजे सवारी. सवारी ह्या तालावरून या वाद्यसमूहाला स्वारी हेंच नांव पडलें. या सवारींत वाजणारीं वाद्यें अशीं : चार (कधीं चाराहून अधीक) घुमटें, एक समेळ, कांसाळें, मृदंग आणि ट्रॅंगल, ह्या प्रत्येक वाद्याचा वादक कसबी, लयींत मुरलेला तसाच लयकारीचीं बारीकसारीक अंगें जाणणारा असाच असवा लागतो. घुमट वाजवणारा ताकदवानहि असावा लागतो. सवारीची स्थाई गत वाजवतांना किंवा आदि-तालाची आवर्तनाची गत पुरी करतांना मुरब्बी-वादक समेवर येतो तो घामाघूम होऊन!

फाल्गुन कृष्णपंचमीला उत्सवाला सुरुवात होते. चौदा वातींचा एक मोठा प्रचंड लामण-दिवा चौदा सुवासिनींनीं पेटवायचा. आस-पासच्या पंचक्रोशींतले मुरब्बी वादक सन्मानानें बोलवायचे. गांवातल्या माननीय वयस्कांनी त्यांच्या गळ्यांत घुमट बांधायचें आणि देवाला आवाहनाचा साद घालून देऊ नायकानें चंद्रावळीचा पहिला चरण म्हणायचा, “हे गणराज तुज नमितों भावें”!—कीं, नमितों, मधल्या ‘न’ ह्या अक्षरावर एकाच दमानें आणि एका आवाजाने सर्व वाद्यसमुहानें सम द्यावी. आणि समेपासून समेपर्यंत सोळा मात्रांचा एक जोरदार तडफेचा मुखडा कुडु-नायकानें मारावा :

“धी त्त धी धीत धित्ता किंटतक,
धी त्त धी धीत धित्ता किटतक,
तणङ् ता तिता थैय्या, तणङ् तातिता थैय्या
तणङ् तातिंता थै।”

आणि पाहुण्यांना आव्हान करावं. आव्हा-नाचा स्वीकार स्पर्धायुक्त अंतःकरणानें करून पाहुण्यानें आपलें कसब आपल्या गांवचें ब्रीद राखण्याकरितां दाखवावें. आणि अशारितीनें वाढत्यारंगतीच्या गतीनें चंद्रावळ चालूं लागे. समेळ वाजवणाऱ्यालासुद्धां त्यांतले संपूर्ण बोल यावे लागतात. घुमटावरचा मुखडा, परान घेऊन कुठं थांबेल याचा बरोबर समज त्याला असावा लागतो. दुपटीनें किंवा चौपटीनें समेळावर फिरणाऱ्या त्याच्या काठ्या समेच्या शेवटच्या मात्रेवर ब्रेक लागल्या सारख्या थांबल्या पाहिजेत. श्रोत्यांच्या कानांप्रमाणेंच त्यांचे डोळेहि अशावेळीं त्याच्याच हातावर स्थिर असतात. दहा वाजतां सुरू झालेली चंद्रावळ पहाटेपर्यंत चालते. मधून मधून विश्रांतीसाठीं परान संपली कीं मेळ्यांतल्या कलावंतिणीचें एखादें गाणें असतें, आणि जिथें तिचें गाणें संपतें तिथली मृदंगाची सम धरून पुन्हां चंद्रावळ चालू होते.

सोळा मात्रांच्या त्रितालांत दहा मात्रा, पुन्हा त्याच्यांत बारा मात्रा, चौदा मात्रा असे मात्रा भरण्याचे प्रकार त्यांत चालतात. त्यांत हार-जीतहि असते. तशाच प्रसंगीं वादही निर्माण होतात.

लय भास्कर कै. खांप्रूजी पर्वतकरांपासून हिंदोडगांवच्या अर्जुनग्यांसारख्या ज्ञानवृद्धानां बोलवून त्यांच्यासमोर कैफियत मांडून निवाडा घेतला जात असे. एखाद्या गाजणाऱ्या खटल्यासारखा हा विषय घरोघरीं आपुलकीनें चर्चिला जात असे हे प्रकार सदैव चालत, अजू-नही चालतात. तिथें व्यवस्थित पाहिजे ती लय. फार तर करामतीचें वादन नको; पण असेल ते लयींत पाहिजे. अगदीं मेट्रोनमसारखें. कदाचित् मेट्रोनम यंत्रच असल्यानें मागें पुढें होईल; परंतु आमची लय हालायची नाहीं! ती सुतासारखी सरळ चालेल. गोमंतक प्रसिद्ध आहे तो या लयकारीबद्दल, तत, वितत, घन आणि सुषिर अशा वाद्य परंपरेचे अनेक गोमंतकीय कलावंत हिंदुस्थानभर प्रसिद्धीला आलेले आहेत, ते लयकारीचें हें मोठें अंग दाखवूनच. या लयकारीच्या नादांत सामा-न्यानां झुलविणारी करामतीची तयारी त्यानीं केली नसली, तरी वाद्यांतला नादब्रह्माचा प्राण जी लय, ती मात्र त्यांच्या रोमरोमांत भिनलेली असते. ताल कुठलाही असो, तो सम किंवा विषम मात्रांचा असो, त्याचा ठेका ज्या लयींत चालू केला ती लय दोन तासपर्यंत सुतासारखी सरळ राहील. म्हणूनच त्याच्या ठेक्याची स्तुति, मोठमोठे खानदानी गायक घरंदाज बजवय्ये मुक्त मनानें करतात.

अंत्रूज महालांतल्या सर्व प्रसिद्ध देवालयांत नवरात्रांच्या उत्सवांत आरतीच्यावेळी उत्सवमूर्ति मखरांत बसवून मखर हालवतात त्यावेळीं म्हटल्या गेलेल्या आरतीचा प्रत्येक चरण निरनिराळ्या तालांत वाजवला जातो. आडाचौताला, रूपक, दीपचंदी, सवारी अशा विषम मात्रांच्या तालांत तिथले बजवय्ये वाद्यांवर अशी करामत करीत की ऐकणाऱ्यानें देहभान विसरून जावें. त्यांचा ढोलसुद्धां सुरांत असे.

(पान ४२ वर पुढें चालू)



# परमेश्वर आणि मी

* आचार्य अत्रे
* शां. सा. मिरजकर
* श्रीमति मोगुबाई कुर्डीकर

हजारों वर्षें मानवानें जंग जंग पछाडले. पण या सृष्टीच्या सर्वशक्तिमान नियंत्याच्या अस्तित्वाचें गूढ अजून तरी त्याला उकललेलें नाहीं. थोर भक्तजनांना साक्षात्कार झाल्याचे दाखले आहेत आणि सर्वसामान्यांच्या जीवनांत कधीं कधीं अतर्क्य अशा घटना घडून येतात आणि हें गूढ अधिकच गहन होतें. दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांत अग्रभागीं चमकणाऱ्या कर्तृत्ववान व्यक्तींपासून तों समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तींना या विषयाबाबत एक प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आली. ही प्रश्नपत्रिका पुढें दिलीच आहे. या उपक्रमाला सर्वांनीं मोठें आपुलकीचें सहकार्य दिलें. या उत्तरपत्रिकांतील निवडक अशा कांहीं पत्रिका दरमहिन्यास आम्हीं वाचकांना सादर करणार आहोंत.

## — आमची प्रश्नपत्रिका —

१—आपला परमेश्वरावर विश्वास आहे का ? असेल तर कां ? नसेल तर कां नाहीं ?

२—आपला धर्मावर विश्वास आहे का ? असेल वा नसेल ! तर काय म्हणून ?

३—आपण प्रतिदिनीं पूजा वा प्रार्थना ह्यापैकीं कांहीं नियमितपणें करतां काय ? आपण एखाद्या धार्मिक पुस्तकाचें वाचन करतां काय ?

४—आपणांस दैवी अथवा अतिमानवी, म्हणजे ज्याचें स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कान्वयें देतां येत नाहीं, असा कांहीं अनुभव आलेला आहे काय ?

५—वरील प्रश्नांशिवाय मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधासंबंधी आणखी कांहीं सांगूं शकाल का ?

## आचार्य अत्रे

महाराष्ट्राचे तुफानी लेखक. त्यांचे व्यक्तिमत्वच झुंझार आणि झंझावाती. त्यामुळें गेलीं कित्येक वर्षें महाराष्ट्रानें अत्र्यांवर सारखें प्रेम केले आहे. पत्रव्यवसाय, राजकारण आणि साहित्य या तिन्ही आघाड्यांवर आत्रेय कर्तबगारी कांहीं न्यारीच. त्याची सर कुणाला आली नाहीं आणि येणार नाहीं.

उ १—हें विश्व चालवणारी परमेश्वर नांवाची एक व्यक्ति आहे अशी जर त्याच्यासंबंधी कल्पना असेल तर तिच्यावर माझा मुळीच विश्वास नाहीं. पण ईशावास्योपनिषदांच्या पहिल्या ओवींत ईश शक्तीचें जें वर्णन केलेलें आहे, 'ईशावास्यं इदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्' ही कल्पना मला सत्य वाटते.

उ. २—देवधर्मावर माझा विश्वास नाहीं. व्यक्तित्वाच्या विकासासाठीं आणि पुरुषार्थांच्या प्राप्तीसाठीं अशा देवधर्मांची आवश्यकता आहे असें मला वाटत नाहीं. या विश्वाचे वैज्ञानिक कोडें प्राचीन काळीं न समजल्यामुळें त्या अज्ञानामधून देवाचा आणि धर्माचा उगम झालेला आहे. ज्ञानावर आणि विज्ञानावर विश्वास असणाऱ्या आधुनिक मानवानें ह्या देवाधर्माच्या फंदांत न पडलेलें बरें.

उ. ३—कर्मकांडावर माझा विश्वास असल्यानें प्रतिदिनीं पूजा व प्रार्थना करण्याचा प्रश्न उत्पन्न होत नाहीं. पूजा जर मी करीतच असेन तर ती पुस्तकांची आणि प्रार्थना जर करीत असेन तर ती प्रतिभेची. इतकें सांगितल्यानंतरहि एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे कीं मी कर्मठ नसलों तरी भाविक आहे. पंढरपूर, देहू, आळंदी ह्या क्षेत्रांना मी जातो. ह्याचें कारण त्या ठिकाणीं देवाचें वास्तव्य आहे असें नसून ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथासारख्या साधूसंतांनीं जो कुळधर्म मराठी माणसाला घालून दिलेला आहे त्याचें प्रतिपालन करणें हें मी माझें परमपवित्र कर्तव्य समजतों. विठोबा हें महाराष्ट्राचें कुलदैवत आहे अशी माझी भावना आहे. आणि ज्या दैवतापुढें अनेक शतकें मराठी जनतेची मस्तकें अवनत होत आहेत, त्याचें भक्तिपूर्वक दर्शन घेण्यांत कोणालाहि लाज वाटण्याचें कारण नाहीं. तुकोबांच्या अभंगाचा गाथा मी बहुधा नियमितपणें वाचतों. ज्याला तुकोबांचा निदान एक तरी अभंग पाठ येत नाहीं तो मराठी माणूस नाहीं असें माझें मत आहे.

उ. ४—दैवी किंवा अतिमानवी अनुभव आतापर्यंत मला कधीं आलेला नाहीं. योगायोगाच्या अनेक अद्भूत गोष्टी घडत असतात. कारण आयुष्य ही एक अद्भूतरम्य कादंबरीच होय. अशा योगा-

योगांच्या घटनांना सामान्य माणसें दैवी किंवा अतिमानवी गोष्टी म्हणत असावींत अशी माझी कल्पना आहे.

उ. ५—मानव आणि परमेश्वर ह्यांचा संबंध जितक्या लौकर तुटेल तितक्यांतच उभयतांचें कल्याण आहे. परमेश्वरानें माणसाला उत्पन्न केलें नसून माणसानें परमेश्वराला उत्पन्न केलेलें आहे.

स्वतःच्या दोषांवर आणि अज्ञानावर मानवानें घातलेलें परमेश्वर हें एक पांघरूण आहे. तें दूर केल्यावांचून मनुष्याचा उद्धार होणेंच शक्य नाहीं.

## शां. सा. मिरजकर

मुंबईच्या मेयरपदावर एक साधासुधा कामगार पुढारी अधिष्ठित होण्याचा पहिला मान मिरजकरांचा. आतांपर्यंतचें सारें आयुष्य झगड्यांत, हालअपेष्टांत आणि तुरुंगांत गेलें; पण त्यामुळें लोकसेवेची तीव्रता कांहीं कमी झाली नाहीं.

उ. १—माझा परमेश्वरावर विश्वास नाहीं. कारण परमेश्वराचें जें वर्णन आस्तिक करतात, उदा० तो दयाळू आहे, त्याला मनुष्यमात्राची दया येते वगैरे त्याची प्रचीति मला चालू जगांत येत नाहीं. दुःख, दारिद्र्य, दैन्यावस्था, मुठभर लोकांचा जुलम हेंच पदोपदीं पहावयास सांपडतें आणि परमेश्वराचें अस्तित्व त्याच्या वर्णनाप्रमाणें असतें तर त्या सर्व शक्तिमान परमेश्वरानें आजचें जग अशा स्थितींत कसें चालूं दिलें असतें ? म्हणून माझा विश्वास सर्वशक्तिमान अशा जनतेच्या सामर्थ्यावर आहे आणि त्या शक्तीच्या जोरावर आजचें जग जरी तें परमेश्वरानें निर्माण केलें असेल तरी तें बदलून घेतां येईल अशी मला खात्री वाटते म्हणून मला या काल्पनिक परमेश्वरावर विश्वास ठेवण्याचें कारण नाहीं.

उ. २—मी माझ्या लहानपणीं धार्मिक होतों, धर्मावर विश्वास होता. माझी आई अत्यंत धार्मिक, उपासतापास, व्रत वैकल्यें करायची, मलाही वाटे कीं यांत कांहीं तरी अर्थ आहे परंतु मला जेव्हां स्वतंत्रपणें विचार करण्याची शक्ति आली तेव्हां हळूहळू माझा या धार्मिक गोष्टीवरून आणि धर्मावरून विश्वास उडाला. एकच गोष्ट सांगतो, आमच्या घरांत एकदां एक छोटेंसं भांडण झालं आणि माझी आई घर सोडून पंढरपुरला गेली. मी तिच्या पाठोपाठ तिला आणण्यासाठीं पंढरपुरला गेलों. तिथें माझ्या आईनं विठोबाचं दर्शन घेण्यासाठीं मला देवळांत नेलं. मुंबईचा माणूस पहातांच ओळखतां येतो. मी ज्यावेळीं आंत गेलों तेव्हां तेथील बडव्यांनीं विठोबाच्या मूर्तीवरील माळा काढून माझ्या गळ्यांत घातल्या आणि तेल चढविण्यासाठीं १० रु. मागितले. माझ्या विचारांत खाडकन् बदल झाला. धर्माचा देवाचा कांहीं माणसं पैसे कमाविण्यासाठीं कसा उपयोग करतात याची मला कल्पना आली. आजही समाजांत अत्यंत धार्मिक लोक बहुजन समाजाला कसे नाडतात याची उदाहरणें कांहीं कमी नाहींत. मग विचारवंतांनी त्यावर विश्वास कसा ठेवावा ! मी एकच धर्म जाणतो. तो म्हणजे मनुष्यमात्रावर प्रेम. मानवी समाजाची सेवा हा अत्यंत श्रेष्ठ धर्म आहे. तोच मला मान्य आहे.

उ. ३—कांहींहि नाहीं. मधून मधून मी तुकारामाचे अभंग, दासबोधांतील ओंव्या चाळतो. थोडीशी ज्ञानेश्वरीहि वाचली आहे. परंतु तें करतांना उद्देश अगदीं निराळा. वाङ्मयाच्या थोड्याशा आवडीमुळें मी हें वाचन कधीं कधीं करतो.

उ. ४—अनुभव नाहीं.

ज्याचं दैवी व अति मानवी वर्णन करतात त्या सर्व गोष्टी आजच्या शास्त्रीय युगांत शास्त्राधारें समजावून घेण्यासारख्या आहेत. आपल्याला जेव्हां कांहीं गोष्टींचा अर्थ लावतां येत नाहीं तेव्हां आपण त्याचें वरील प्रमाणें वर्णन करतो. उदा० आपण बगीच्यांत गेलों. एकाद्या झाडाचं नांव मुलानं विचारलं कीं आपल्याला ठाऊक नसेल तर आपण 'विलायती झाड' म्हणतो. तसेंच दैवी व अति मानवी या गोष्टी आजच्या शास्त्रीय प्रगतीनें मागें टाकलेल्या आहेत आणि ती प्रगति सरतेशेवटीं या शब्दांचें अर्थ लावील असें मला वाटतें.

उ. ५—प्रश्न उद्भवत नाहीं.

## श्रीमती मोगुबाई कुर्डीकर

भारत विख्यात मान्यवर गायिका. मरहूम अल्लादिया खाँ आणि हैदर खाँ साहेब यांच्याकडून नायकी मिळाली. कांहीं उत्तम शिष्यांना वाई तालीम देत आहेत. विसाव्या शतकांतला हा बहुदा एकमेव अपवाद !

उ. १—परमेश्वरावर माझी अपार श्रद्धा आहे. स्थिरचरांत व्यापून आणि शिवाय दशांगुळी उरलेल्या त्या चित् शक्तिला विश्वास, अविश्वास अशा शब्दांत गोवणें कसेंसेंच वाटतें !



उ. २—उत्तम आचार, उत्तम विचार, उत्तम संस्कृति ज्या धर्मांत सांगितल्या आहे त्या धर्मावर अर्थातच माझा विश्वास आहे !

उ. ३—ज्ञानेश्वरी, दासबोध, शिवलीलामृत या पुस्तकांचें माझें रोजचें वाचन. माझें मन अत्यंत श्रद्धाळू असल्यानें पूजादि रोजचीच करतें.

उ. ४—दैवी अथवा अतिमानवी असा कांहीं अनुभव नाहीं; परंतु प्रपंचांतली मोठ्यांत मोठी अडचण ईश्वरी स्मरणानें निभावलेली आहे. आणि हाच साक्षात्कार म्हणायला हरकत नाहीं.

उ. ५—काया-वाचा-मनें मीं गान विद्येची साधना केली. अजून करते आहे. अर्थातच कलावंत हा भावनावश असल्यानें 'परमेश्वर स्वरूप जनार्दन' या व्याख्येवर माझा विश्वास आहे.

• • •

## गुरु कुणाला म्हणावें ?—

जो तुमच्या आंतील पुंजीभूत संस्कारराशि पाहूं शकतो, त्या संस्कारांनी भूतकाळांत तुमचें कसें नियंत्रण केलें, व भविष्यकाळांत ते तुम्हांला कुणीकडे वेऊन जाणार आहेत हें सांगूं शकतो, म्हणजेच ज्याला तुमच्या भूतभविष्याचें ज्ञान आहे तोच तुमचा गुरु.

**स्वामी विवेकानंद**

अनुक्रमणिका

( पान १४ वरून )

स्वयंपाकघरांत गेली. चटकन् स्टोव्ह पेटवून तिनें अन्न गरम केलें. आणि मग महेश्वरपंतांच्या ताटांत ती एकेक जिन्नस वाढूं लागली. अगदीं हलक्या हातानें ! नीटनेटकेपणानें ! त्यांनी खावें या आस्थेनें तिनें सर्व पदार्थ वाढले.

आणि महेश्वरपंत पाटावर येऊन बसले. ताट पाहून त्यांची मुद्रा प्रसन्न झाली. मन लावून ते जेवले. "अमुक वाढ" "तमुक वाढ" असें जेव्हां ते म्हणाले, तेव्हां ताराचा जीव सुपाएवढा झाला. किती तरी वर्षें नवऱ्याला आपण जेवण करून वाढत आलों आहोंत असें तिला वाटलें. वाढतां वाढतां, आतां उद्यां काय करायचें, हा विचार तिच्या मनांत घोळूं लागला. महेश्वरपंतांचे जेवण आटोपतांच तिनें त्यांच्या हातावर पाणी घातले. मोठ्या तत्परतेनें त्यांच्या हातांत रुमाल दिला. आणि अगदीं हळवेपणानें त्यांच्या हातावर सुपारी ठेवली. लवंग वेलदोडा दिला.

महेश्वरपंत सुपारी खात खात आपल्या निजायच्या खोलींत गेले. पलंगावर पडले.

इकडे तारानें महेश्वरपंतांचेंच पान पुढें ओढलें. आणि त्यांत उरलेले ती जेवूं लागली. पण तिला जेवण जाईना. कसल्यातरी हुरहुरीनें तिचें पोट भरून गेलें. मग तिनें झाकापाक केली. हें करतानाच तिच्या मनांत स्वयंपाकघरांत आणखी कोणकोणत्या वस्तू आणायच्या याचे विचार येऊं लागले. आणि त्याचवेळीं महेश्वरपंतांचे रूप समोर येऊं लागलें. महेश्वरपंतांना झोप लागली असेल कां अशा विचारांत ती तांब्यांत पाणी भरूं लागली. तें तांब्याभांडें आज ती अडखळत्या पावलानें नेऊं लागली. दारांतच थबकून तिनें पाहिलें तो महेश्वरपंतांना झोंप लागलेली दिसली. हळूंच तिनें तांब्याभांडें खिडकींत नेऊन ठेवलें. आणि क्षणभर ती महेश्वरपंतांकडे पहात उभी राहिली. त्यांचा चेहरा, त्यांचे हात, त्यांचे पाय, त्यांची ती सुंदर मान, ते काळे कुरळे केस,......ताराची दृष्टि हलेना. पाय उचलेना. कितीहि पाहिले तरी तृप्ति होईना. ज्याच्याशीं आपलें लग्न लागलें, तो पुरुष इतका सुंदर, इतका देखणा,...तिच्या चेहऱ्यावर स्मित उमलूं लागलें. या पलंगाच्या कठड्यावर, अगदीं हळूंच, त्यांना जाग येणार नाहीं अशा रीतीनें बसावें काय ? असें मनांत आलें पण ताराला धीर झाला नाहीं. भिंतीशीं टेकून ती उभी राहिली. पाठीवरचा पदर पुढें ओढला. आणि ताराच्या हिरव्या बांगड्या वाजल्या—

महेश्वरपंतांनी डोळे उघडले. ताराला समोरच पहातांच त्यांनीं तिचा हात धरला आणि तिला इतक्या आवेगानें जवळ ओढलें कीं त्या एका क्षणांत ताराची सारी दुनिया बदलून गेली. सारे रंग बदलून गेले. पृथ्वीवरून तारा अंतराळांत झेलली गेली. स्वतः ताराच मुळीं पालटून गेली. तारा महेश्वर दाते ही आज खरोखरीच सौ. तारा महेश्वर दाते झाली.

ही सौ. तारा दाते दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून आपल्या कामाला लागली. तिला आज पुष्कळच कामें करायची होतीं. घर सजवण्याचे अनेक उपाय तिला सुचत होते. मनांतल्या मनांत ती वेत आंखत होती. प्रत्यक्षांत इकडच्या वस्तू तिकडे ठेवत होती. आणि त्याच वेळीं तिला कालची रात्र आठवत होती. महेश्वरपंतांचा स्पर्श...... मऊ...मुलायम......नाजुक...आणि तरीहि......तरीहि......तारा स्वतःशींच लाजली. लाजली आणि सुखावली. भरतीच्या लाटांवर लाटा याव्यात तशी ती पुन्हांपुन्हां सुखावत होती. सुखानें भारून गेलेल्या अवस्थेंतच तिनें महेश्वरपंतांना चहा करून दिला. चहा बरोबर खायला पोहे करून दिले. त्यांच्या बुटांना पॉलीश करून ठेवलें. कोटाच्या खिशांत रुमालाची घडी ठेवली. आणि तशा त्या बेहोशींतच ती स्वयंपाकाच्या तयारीला लागली. तेव्हां महेश्वरपंत समोर येऊन म्हणाले, "मला जेवायचं नाहीं." सुरांत तिरसटपणाची झाक होती.

"कां ?"

"मी आज बाहेरच जेवणार आहे."

ताराला जणुं गालावर एक चपराकच बसली. ती खिन्नपणें म्हणाली, "बरं," क्षणभर थांबून तिनें विचारलें, "संध्याकाळीं केव्हां याल ?"

"काम संपलं म्हणजे."

"सहा वाजतां ?" तारानें पुन्हां विचारलें.

"सहा वाजतां येईन नाहीं तर दहा वाजतां येईन. तुझा काय म्हणून पहारा ? हा जाच मी सहन करणार नाहीं."

तारा गप्प राहिली. पुन्हां तिचें मन चिंतेनें भरून गेलें. रात्रींचा तो सुखावणारा, बेहोष स्पर्श आठवत होता. पण त्या वेळचें महेश्वरपंतांचें व्यक्तिमत्व आणि आतां हें प्रगट होणारें व्यक्तीमत्व यांचा मेळ बसत नव्हता. हीं जणुं दोन माणसें होतीं. हें जसे परस्पर विरोधी रंग होते. खाडखाड बूट वाजवीत जेव्हां महेश्वरपंत घरांतून बाहेर पडले तेव्हां त्या दिशेला ती नुसती पहात राहिली. तिनें एक आवंढा गिळला. काम आवरण्यासाठीं पदर बांधला. पण बरणींचे झाकण लावता लावतां तिला कालची रात्र दिसूं लागली. परवांचें महेश्वरपंतांचें कोरडें तुसड वागणें आठवलें. लग्ना दिवशींचा लाजाहोम समोर आला. सप्तपदी पुन्हां एकदां झाल्यासारखें वाटलें. महेश्वर सोमनाथ दाते ! तारा महेश्वर दाते ! दाते तारा महेश्वर ! कसला तरी सूर लागत होता. आणि बिघडत होता आणि लागत होता.

सबंध दिवस तारा अस्वस्थपणें कांहीं ना कांहीं करत राहिली. विचारानें थकून गेली पण संध्याकाळ होत चालली तसा पुन्हां उत्साह वाटूं लागला. आतां महेश्वरपंत येतील. आपण त्यांना आधीं चहा देऊं. किंवा सरबत देऊं. किंवा त्यांना काय हवें तें त्यांना विचारून देऊं. मग त्यांना त्यांच्या कामाविषयीं विचारूं. आज कोण कोण भेटले ? कुठें कुठें गेलां होतां ? ते रागावले तरी खट्टू व्हायचें नाहीं. असतो एकेकाचा स्वभाव ! कांहीं कांहीं नवरे तर बायकांना शिव्या घालतात. मारतातसुद्धां ! आपण आपलें त्यांच्या कलानेंच घ्यायचें. टरफलें फेकून दाणे घ्यावेत तसें तारानें स्वतःला समजावलें.

पण महेश्वरपंत रात्रीं नऊ वाजून गेले तरी आले नाहींत. मग दहा वाजले. अकरा वाजले. बारा वाजले. आणि कालच्या प्रमाणेंच एक वाजून गेल्यावर महेश्वरपंत आले. त्यांचा चेहरा चिडखोर दिसत होता. रागावलेला दिसत होता. अंगांतला कोट त्यांनी भिरकावून दिला. बूट फेकून दिले. आणि हात पाय न धुतांच पॅंटसकट तें पलंगावर आडवे झाले.

कसें बोलावें, काय म्हणावें या चिंतेनें तारा व्याकूळ झाली. हळूं

हळूं ती खोलीच्या दाराशीं उभी राहिली. तिला पहातांच महेश्वरपंत खेकसले, " कशाला आलीस ? "

" बरं नाहीं कां ? " आंत पाऊल टाकत तारा घाबरटपणें म्हणाली.

" सारखं बरं नाहीं कां, बरं नाहीं का काय विचारतेस ? मी आजारी पडावं अशी इच्छा आहे कीं काय तुझी ? मला नाहीं कुणी असं विचारलेलं आवडत."

तारानें मनच गिळून टाकलें. परत आंतल्या खोलींत जावें कीं काय असें वाटलें म्हणून ती वळली सुद्धां पण परत फिरून म्हणाली, " जेवायला येणार ना ? "

महेश्वरपंत डोक्यावरून पांघरूण घेणार होते ते थांबून पुन्हां ओरडले, " काल एकदां सांगून टाकलं होतं तेंच पुन्हां आज सांगतो कीं तुझ्या हातचं जेवण मला नको आहे. "

" कां बरं ? "

" कारण तूं माझी कोणी नाहींस आणि मी तुझा कोणी नाहीं. "

" आपण नवरा-बायको आहोत. " तारा एकदम शांतपणानें म्हणाली.

" नाहीं, नाहीं, नाहीं. गेले चार दिवस हेंच मी तुला ओरडून सांगतो आहे.

" आपण एक दिवस संसार केला. " तारा अधिकच थंडपणानें महेश्वरपंतांकडे पहात म्हणाली, " काल मी स्वैपाक केला आणि तुम्ही जेवलांत. कालच आपण तुमच्या वडिलांचं कर्ज फेडलं. " दोन्ही हात आणि मान पुढें करून तारा म्हणाली.

" आणि त्याची फेड म्हणून कालचा दिवस मी तुझ्याशीं संसार केला समजलीस ? आतां तुझा माझा संबंध नाहीं. "

" जन्माचं जडलेलं नातं असं एका क्षणांत नाहींसं होत नसतं. " तारा तितक्याच थंडपणानें पण निश्चयानें म्हणाली. " आपण तुमच्या वडिलांचं आणखी कर्ज असलं तर फेडूं या. "

" तोंड बंद कर. " महेश्वरपंत तिच्या दिशेनें एक पुस्तक भिरकावत ओरडले, " कोणी सांगितलं तुला कीं तें कर्ज माझ्या वडिलांचं होतं. "

" तुम्हीच ! "

" तें मी खोटं सांगितलं. आतां खरं सांगतों कीं तें कर्ज माझं होतं. "

" मग तर फारच उत्तम झालं. " तारा थोडीशी पुढें येत म्हणाली. " एका परीनं दुरावा नाहींसा झाला. तुमचं कर्ज तें माझंच कर्ज आहे. "

" नाहीं. माझं कर्ज तें तुझं कर्ज नाहीं तारा. तुझा माझा कांहीं संबंध नाहीं. कांहीं नातं नाहीं. सांगतो ते नीट ऐक. नाहीं तरी केव्हां तरी सांगायलाच हवं खरं. "

" सांगा. मी ऐकायला तयार आहे. बायको म्हणून मी तुमचं सारंच ऐकायला तयार आहे. "

" माझी बायको दुसरीच कोणी आहे. कान उघडून ऐक. माझा संसार अगोदरच थाटलेला आहे. माझं एका मुलीवर प्रेम आहे. माझं त्या मुलीशीं लग्न झालेलं आहे. "

" मग माझ्याशीं लग्न..."

" तें मी कालच तुला सांगितलं " तिला मध्येंच थांबवून महेश्वरपंत म्हणाले, " मी कालच तुला सांगितलं कीं मला पैसा हवा होता म्हणून मी तुझ्याशीं लग्नाचं नाटक केलं. "

" पैसा कशाला हवा होता ? "

" माझ्या बायकोला द्यायला. तिला मला पैसे द्यावे लागतात. तिचा खर्च मला चालवावा लागतो. "

" मग ती तुमची बायको इथें कां रहात नाहीं ? "

" तोंड संभाळून बोल. " महेश्वरपंत कांगावा करीत मोठ्यानें म्हणाले, " तो माझा प्रश्न आहे. मी तिला कुठेंहि ठेवीन. पण तुला मात्र या घरांत रहातां येणार नाहीं. "

" कुठें असते ही तुमची बायको ? "

" कुठेंहि असली तरी तुला तिच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. हें समजल्यावांचून तुझं कांहीं अडणारहि नाहीं. पैशासाठीं मी तुझ्याशीं लग्न केलं आणि तें माझं काम झालेलं आहे. समजलं ? माझा संसार आहे हें तर खरंच. पण केव्हां आवश्यकता वाटली तर बाजारांत हवा तसा माल मिळतो. आलं लक्षांत ? "

" आलं ! " ताराहि भान सुटून ओरडली. आणि दुसऱ्याच क्षणीं हृदय दुभंगल्यासारखी रडूं लागली.

" गप्प बैस ! " महेश्वरपंत एकदम चवताळून आले, " दुबळी ! बावळट ! मूर्ख ! खरी गोष्ट ऐकण्याचं धैर्य नाहीं. पहाण्याचं तर नाहींच नाहीं. पण एक सदाचंच लक्षांत ठेव कीं इथें तुला थारा नाहीं. "

" मग मी कुठें जाऊं ? "

" कुठेंहि जा. "

" आणि करूं काय ? "

" कांहींहि कर. कुणाचा हात धरून जा. "

" कृपा करा. " तारा एकदम पदर पसरून म्हणाली, " तेवढं बोलूं नका. हें असलं नाहीं बोललांत तर नाहीं का चालायचं ? "

" किंवा वाटल्यास पुन्हां एकदां कुणाशीं तरी लग्न..."

" हे असले अभद्र विचार तुम्हीहि करूं नका आणि मलाहि ऐकवूं नका. मला हें ऐकवत नाहीं. "

" ऐकवत नाहीं तर ऐकूं नकोस. पण एकदां इथून काळं कर. तूं ज्या दिवशीं इथून जाशील त्या दिवशीं मी सुखी होईन. "

" तुम्ही सुखी व्हावं हीच माझी इच्छा आहे. " तारा कशीबशी दाराला धरून उभी रहात म्हणाली, " तुम्हांला सुख व्हावं हीच माझी इच्छा आहे. तुमचं माझ्यावर प्रेम नसेल पण माझं तुमच्यावर आहे. तुम्ही नातं मानत नसाल पण मी मानते. तुम्ही संस्कार जुमानत नसाल, पण त्या एका संस्कारानं माझ्या आयुष्याची दिशाच मुळीं बदलून गेली. तुम्ही मला सोडूं शकत असाल, पण मी तुम्हांला सोडूं शकत नाहीं. कोणत्या तरी अज्ञात शक्तीनं मी तुम्हांला बांधली गेले आहे. माझ्यावर एवढीच दया करा. "

" कसली दया ? " महेश्वरपंत एकदम ओरडले, " दयाबिया मला सांगूं नकोस. "

" इथून पुढें मी सगळं तुम्हांलाच सांगणार. "

[ पान ५५ वर पुढें चालू ]




निसर्गाशीं तादात्म्य पावलेला 'बालकवि' हा मराठी कवितेचा एक अमोल ठेवा आहे. माधव ज्यूलियनपासून मर्ढेकरांपर्यंत सर्व श्रेष्ठ कवींनीं बालकवींचें ऋण घेतलें आहे. अशा या थोर कवींचें अपघाती निधन म्हणजे मराठी कवितेचें झालेलें अपरंपार नुकसान. ४० वर्षांपूर्वी या प्रसंगीं मासिक मनोरंजनच्या मे महिन्याच्या अंकांत मनोरंजनच्या संपादकांनीं या थोर कवींचें गुणवर्णन करणारा जो लेख लिहिला आहे तो वाचकांना आजहि हृद्य वाटेल.

# महाराष्ट्राचा बालकवि

**" सृष्टिदेविचा प्राण खरा ।**
**बालकवे ! तूं कवीश्वरा ।**
**तूंच खरा कविराज गुणी ।**
**सरस्वतीचा कंठमणी ॥ "**

महाराष्ट्राचे बालकवि श्री. त्र्यंबक बापूजी ठोमरे यांची अत्यंत दुःखकारक निधनवार्ता मनोरंजनाच्या प्रिय वाचकांना कळविण्याचें आज आमच्या नशिबीं आलें आहे ! चालू महिन्याच्या पांचव्या तारखेस सकाळीं आठ वाजण्याच्या सुमारास नशिराबाद स्टेशनवर बालकवि श्रीयुत ठोमरे रेल्वेचे रूळ ओलांडून पलीकडे जात असतां त्यांचा पाय अडखळून ते खालीं पडले. त्याचवेळीं मागून मालगाडी आली, त्यांच्या अंगावरून गेली, आणि तिनें त्र्यंवक बापूजी ठोमरे या नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या देहरूपी नश्वर गृहांत सव्वीस सत्तावीस वर्षे पेटणारा अद्भुत व परमरमणीय तेजाचा दीप विझवून टाकला ! ईश्वराची इच्छा !

श्री. ठोमरे यांचा जन्म पूर्व खानदेशांत झाला. त्यांचें बालपण एरंडोल येथें गेलें. त्यांचे वडील एक उच्च दर्जाचे पोलीस अंमलदार होते. श्रीयुत त्र्यंबकराव सुमारें नऊ वर्षांचे असतांना त्यांचे वडील वारले. त्र्यंबकराव जात्याच स्वतंत्र विचाराचे असल्यामुळें त्या वेळची घरची परिस्थिति त्यांना न आवडून वैतागाच्या भरांत त्यांनीं गृहत्याग केला, व एका कथेकरी बुवांच्या मागून ते उत्तर हिंदुस्थानांत गेले. या प्रवासांतच या बुवांबरोबर त्यांनीं वाङ्मयाचें थोडेसें अध्ययन व सृष्टीचें बरेचसें निरीक्षण केलें. नंतर काश्मीर, आग्रा, मथुरा प्रभृति अनेक प्रेक्षणीय स्थळें त्यांनीं पायीं प्रवास करून पाहिलीं.

ही उत्तर हिंदुस्थानची यात्रा संपवून परत दक्षिणेंत येत असतांना वाटेंत त्यांचा 'वनवासी' या टोपण नांवानें प्रसिद्ध असलेल्या कवीशीं परिचय झाला. पुढें हे दोघे एका गांवीं राहत असतांना 'वनवासी' पटकीच्या आजारानें मृत्यु पावले. या वेळीं त्र्यंबकराव केवळ १३ वर्षांचे होते. याप्रसंगीं त्यांच्या जवळ अवघे चारपांच रुपयेच शिल्लक होते. या परठिकाणीं त्यांनीं आपल्या कविमित्राचें प्रेत गाडींत घालून तेथील स्मशानांत नेलें, व त्याची रीतिप्रमाणें व्यवस्था लावली. जवळ पैसा नाहीं, गांवांत कोणी मित्र नाहीं, जगाचा फारसा अनुभवहि नाहीं आणि अगदींच पोरवय अशा विलक्षण परिस्थितीमध्यें त्र्यंबकराव त्या गांवांतील एका सद्‌गृहस्थाला भेटले. त्याला त्यांनीं आपली एकंदर स्थिती सांगितल्यावर त्या गृहस्थानें त्र्यंबकरावांना कांहीं पैसे उसने दिले. ही मदत मिळाल्यावर ते बडोद्याला गेले. तेथें श्री. सीताराम वासुदेव पेंडसे, बी. ए., यांच्याशीं त्यांचा परिचय झाला, व त्यांचें त्यांना पुढें सहाय्यहि मिळालें.

नंतर ते जळगांव येथें भरलेल्या कविसंमेलनाला गेले. या संमेलनांत त्यांनीं आपल्या कांहीं कविता वाचून दाखविल्या. त्या ऐकून परलोकवासी ले. क. कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांनी त्यांना 'बालकवि' ही सार्थ पदवी दिली. या वेळेपासून महाराष्ट्र त्र्यंबकरावांना याच नांवानें ओळखूं लागला. पुढें पुण्यांत 'केसरी' ऑफिसांत ते कांहीं दिवस नोकरीस होते. तेथें असतां 'केसरी'त त्यांनी क्रमशः 'आधुनिक कविता' या मथळ्याखालीं कांहीं भारदस्त लेख लिहिले, व 'कलापि' या सहीनें कांहीं कविताहि प्रसिद्ध केल्या. पुढें महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध कवि रे० श्रीयुत नारायण वामन टिळक यांनीं श्री. त्र्यंबकराव ठोमरे यांच्यातील काव्यप्रतिभा ओळखून त्यांना विद्याभ्यासार्थ नगराला बोलावलें. नगराला आल्यावर त्यांची चित्तवृत्ति कांहीं दिवस अस्वस्थ होती. श्रीयुत टिळक व त्यांच्या सुशील पत्नी श्रीमति सौ. लक्ष्मीबाई यांनीं त्र्यंबकरावांना स्वतःच्या मुलाप्रमाणें वागविलें. त्र्यंबकराव लक्ष्मीबाईंना मातेप्रमाणें मानीत असत व ते कोठेंहि असले तरी वर्षांतून एकदांतरी सौ. लक्ष्मीबाईंची भेट घ्यावयास चुकत नसत.

त्र्यंबकरावांनीं इंग्रजी तीन इयत्तांचा अभ्यास घरींच केला. व नगर येथील मिशन हायस्कूलमध्यें ते एकदम चौथींत बसले. तेथें पांचव्या इयत्तेचा अभ्यास त्यांनीं पूर्ण केला. शाळेंत असतांना इंग्रजी कवितेचा अर्थ त्यांना इतक्या चांगल्या रीतीनें कळत असे, कीं, प्रत्यक्ष वर्गाचे शिक्षक सुद्धां त्र्यंबकरावांना ती कविता मुलांना समजावून देण्यास सांगत व स्वतः आपण ऐकत बसत. मधूनमधून ते शाळेंत झालेल्या इंग्रजी कवितेचें मराठी कवितेंत भाषांतर करून आपल्या सहाध्यायांना दाखवीत.

कांहीं दिवसांनीं श्रीयुत टिळक यांच्या सल्ल्यानें त्यांनीं नगर येथील मिशन शाळेंत शिक्षकाचें काम पत्करलें. त्यांचें संस्कृताचें ज्ञान चांगलें असल्यामुळें ते इंग्रजी चौथी व पांचवी या इयत्तांना संस्कृत शिकवीत असत. पुढें हळूहळू ते मिशनरी लोकांना मराठी शिकवूं लागले, व त्या वेळेपासून मिशनरी लोकांमध्यें 'मराठी पंडित' म्हणून त्यांची

प्रसिद्धि झाली. उन्हाळ्यांत मिशनरी मंडळी महाबळेश्वरीं जात तेव्हां ते त्र्यंबकरावांनाहि आग्रहानें तेथें बोलावून नेत.

याच सुमारास त्यांनी 'आनंदी आनंद गडे' ही आपली सुंदर कविता, मनोरंजनाच्या पहिल्या दिवाळीच्या अंकांतून (इ. स. १९०९) महाराष्ट्रीय रसिकजनांपुढें ठेवली, व तिचा अत्यादर होऊन तेव्हांपासून महाराष्ट्राला त्यांचा कवि म्हणून चांगला परिचय झाला. यानंतर कांहीं मित्रांच्या व मिशनरींच्या आग्रहावरून पुण्याला जाऊन तेथें नोकरी करण्याचा त्यांनीं विचार केला.

पुण्यास नोकरी करीत असतांना त्र्यंबकरावांची सांपत्तिक स्थिति कांहींशी सुधारली. अशा तऱ्हेनें थोडेंसें बस्तान बसल्यावर त्यांनीं अहमदनगरहून आपली घरची मंडळी आणून पुण्यांत रास्त्यांचे पेठेंत बिऱ्हाड केलें. पुण्यास असतांना त्यांनीं बऱ्याच कविता रचल्या व पुष्कळ विद्वान मंडळींशींहि त्यांचा परिचय झाला.

श्रीयुत ठोमरे यांचें मन अत्यंत कोमल असल्यामुळें गरीब विद्यार्थ्यांचा त्यांना कळवळा येऊन ते शक्तीप्रमाणें कित्येक विद्यार्थ्यांना अन्नदान, द्रव्यज्ञान व वस्त्रदान करीत असत. अशा प्रसंगीं ते आपल्या मित्रांजवळ नेहमीं म्हणत असत, कीं "**ज्याप्रमाणें लहानपणीं जगानें मला पोसलें, त्याप्रमाणें जगाला यथाशक्ति पोसणें हें माझें पवित्र कर्तव्य आहे.**" पुण्यांत असतांना त्यांच्या घरीं एकतरी गरीब विद्यार्थी जेवावयाला नव्हता असें क्वचितच घडलें असेल.

ठोमऱ्यांना जातिनिर्बंधाचें महत्व मुळींच वाटत नव्हतें. सामाजिक बाबतींत त्यांचीं मतें अत्यंत उदार होतीं. त्यांनीं आपल्या प्रेमळ, कोमल, सहृदय, निगर्वी, नम्र, गोड, विनोदी, व अत्यंत साध्या स्वभावामुळें सुशिक्षित रसिकवर्ग सर्वस्वी आपलासा केला होता. त्यांनीं कोणालाहि कधींहिं एका शब्दानेंसुद्धां दुखविलें नाहीं! परंतु त्यांच्या मरणानें मात्र सर्वांचीं हृदयें कायमचीं घायाळ केलीं आहेत!

त्र्यंबकरावांचा एका ठिकाणीं एकदोन वर्षांपेक्षां जास्त राहण्याचा स्वभावच नसल्यामुळें त्यांनीं त्या प्रवृत्तीला अनुसरून लवकरच पुण्यास रामराम ठोकला, व पुन्हां ते अहमदनगरास गेले. अखेरपर्यंत ते तेथेंच नोकरीला होते. अलीकडे त्यांची प्रकृति बरीच ढासळली होती. नुकतेच उन्हाळ्याच्या सुटींत ते आपल्या मेहुण्याच्या गांवीं जाऊन परत येत असतांना वाटेंत, आरंभी सांगितल्याप्रमाणें अत्यंत हृदयद्रावक रीतीनें त्यांच्या इहलोकवासाचा शेवट झाला.

श्रीयुत ठोमरे यांना सूर्योदय, सूर्यास्त, चन्द्रप्रकाश, तारा, नदी, समुद्र, सृष्टिसौन्दर्य इत्यादिकांची फारच आवड होती. पाणी, चन्द्रप्रकाश व सृष्टिसौन्दर्य हीं तीनहि एकवटलेलीं पाहण्याची आपली उत्कट इच्छा डेक्कन कॉलेजमधील एका जिवलग मित्राच्या साह्यानें बोटींत बसून त्यांनीं पूर्ण केली. बोटींत असतांना आनंदातिरेकानें त्यांच्या अंगावर शहारे येऊन ते—

"वघुनि मन धालें
साफल्य दृष्टिचें झालें!"

हे 'दत्त' कवीच्या कवितेचे चरण गाऊं लागले. बोटींत फुलांची शय्या करून चांदण्यांत बसण्याची त्यांनी आपली अत्युत्कट इच्छा पूर्ण केली. "**अशा आनंदाच्या वेळीं बोट बुडून मरण येणें हें केवढ्या भाग्याचें होय!**" असे त्यावेळीं त्यांच्या मुखावाटें उद्गार निघाले होते.

श्रीयुत ठोंबरे यांच्या बहुतेक कविता सृष्टिविषयकच आहेत. त्यांना महाराष्ट्राचा बाल-वर्डस्वर्थ म्हणतां येईल. वर्डस्वर्थ केव्हांहि सृष्टिदेवीला पुढें ठेवून तिच्याशीं संभाषण करून कांहीं प्रमेयें जगाला देत असे; परंतु ठोंबरे सृष्टीशीं पूर्ण तादात्म्य पाहून तिच्यांतच रममाण होत असत.

धाडशी भराऱ्या, स्वर्गीय कल्पना, साधे शब्द, दांडगी प्रतिभाशक्ति, आंग्ल कवि किट्स् याची प्रेममयता इत्यादि गुण ठोमरे यांच्यामध्यें प्रामुख्यानें वसत होते. तत्वज्ञानाचा त्यांना तिटकारा असे. त्यांच्या कवितेंत तत्त्वज्ञान व Mysticism मिळाववाचीं नाहींत. त्यांच्या काव्याची गुरुकिल्ली जर कोणची असेल तर सृष्टीमध्यें असलेलें प्रेम हीच.

त्यांची प्रतिभाशक्ति इतकी दांडगी होती, कीं, एका बैठकींत शेंदोनशें ओळी ते सहज लिहून काढीत. त्यांना त्या न आवडल्या तर लगेच त्या ते फाडून टाकीत. अशा रीतीनें त्यांनीं आपल्या बऱ्याच कविता फाडून टाकल्या. ते कविता अत्यंत चिकित्सक बुद्धीनें लिहीत असत. प्रेरणा झाल्याशिवाय त्यांना कविता लिहितां येत नव्हती. किंवा प्रेरणा थांबल्यास तें काव्यहि अर्धवट रहात असे. 'शबरी' 'निश्वास' 'चौबडा' 'शून्य' इत्यादि त्यांचीं अत्यंत उत्कृष्ट काव्यें अपुरींच राहिलीं आहेत. 'हृदयत्रिपुटी' नामक एक कादंबरी त्यांनीं लिहावयास घेतली होती, पण तिच्या पहिल्या प्रकरणापुढें ती गेली नाहीं.

श्रीयुत ठोमरे यांना तुकाराम, ज्ञानेश्वर, रामजोशी, होनाजीबाळ, सगनभाऊ यांची कविता व शालिग्राम यांनीं प्रसिद्ध केलेले पोवाडे फार आवडत असत. शाकुंतल, रघुवंश, उत्तररामचरित् इत्यादि संस्कृत काव्यनाटकांचा त्यांना फार षोक होता. 'केशवसुतां'चीं काव्यें सटीक लिहून प्रसिद्ध करण्याची त्यांची फार इच्छा होती. 'टिळक' 'दत्त,' 'विनायक', 'केशवसुत,' 'गोविंदाग्रज' प्रभृति कवींशी त्यांचा विशेष परिचय होता.

श्रीयुत ठोमरे यांचें इंग्रजीचें ज्ञान बेताचेंच असूनसुद्धां त्यांना शेले, बायरन, किट्स्, व शेक्सपीअर यांच्या कविता चांगल्या समजत असत. शेले त्यांना विशेष आवडे. शेलेप्रमाणेंच आपल्याला मरण यावें, असें आपल्या मित्रांजवळ नेहमीं उद्गार काढीत. त्यांना मनुष्यस्वभावाचें फार चांगलें ज्ञान होतें.

श्रीयुत ठोमरे यांनीं अगदीं थोडीच काव्यरचना केली असली तरी तिच्यायोगें त्यांनीं महाराष्ट्रकाव्याला अगदीं नवीन प्रकारचें वळण लावलें आहे. महाराष्ट्र वाङ्मयांत सृष्टिविषयक कविता ठोमऱ्यांशिवाय दुसऱ्या कोणाची क्वचितच असेल.

श्रीयुत ठोमरे यांच्यावर रे. श्रीयुत नारायण वामन टिळक व त्यांच्या पत्नी श्री. सौ. लक्ष्मीबाई या रसिक कविदांपत्याचें पुत्रवत् प्रेम असे. या उभयतांनीं बालकवि ठोमरे यांना महाराष्ट्रापुढें आणण्यासाठीं, त्यांना शिक्षण देण्यासाठीं व त्यांचा सर्वतोपरी उत्कर्ष करण्यासाठीं जे आस्थेने प्रयत्न केले ते त्यांचे श्री. ठोमऱ्यांवर नव्हे तर महाराष्ट्रवाङ्मयावर एक प्रकारें उपकारच झाले आहेत. श्रीयुत ठोमरे यांच्याविषयीं दोन शब्द लिहिण्यासंबंधीं आम्ही रे. टिळक यांना विनंतीं करतांच आपणाला पुत्राप्रमाणें प्रिय असणाऱ्या या बालकवीच्या भयंकर मृत्यूनें त्यांचे

हृदय अत्यंत विव्हल झालें असतांहि आमच्या विनंतीला मान देऊन पितृप्रेमानें भरलेला लहानसा लेख पाठवून दिला. याबद्दल मनोरंजन त्यांचे आभारी आहे. आमचे तरुण कविमित्र श्रीयुत केशवकुमार, त्याचप्रमाणें या बालकवीचे व मनोरंजनाचे परममित्र श्रीयुत केशवराव मुदलियार आणि रे. श्रीयुत भास्करराव उजगरे यांनींहि श्रीयुत ठोमरे यांच्या चरित्रासंबंधानें वगैरे माहिती पुरविण्यांत जी आस्था व प्रेम व्यक्त केलें त्याबद्दल त्यांचेहि आम्ही फार आभारी आहों.

श्री. ठोमरे यांना मनोरंजनाविषयीं अत्यंत आदर आणि अभिमान असे. महाराष्ट्राच्या या बालकवीची समग्र कविता स्वतंत्र पुस्तकरूपानें शक्य तितक्या लवकर प्रसिद्ध करण्याची मनोरंजनाची उत्कट इच्छा, बालकवीच्या व मनोरंजनाच्या सहृदय मित्रांच्या सक्रीय सहानुभूतीनें पूर्ण होवो, अशी परमेश्वराची प्रार्थना करून, हा दुःखद लेख पूर्ण करतो.

( पान ३४ वरून चालू )

मुळांतच नाजुक वाद्यें वाजवणारे या महालांत ज्यास्त त्यांत परंपरागत लयकारीचेहि खंदे.

रामनाथींचे वादनकार कवळ्याला जायचे आणि आपली श्रेष्ठता दाखवायला कवळेंकरांवर कडी करण्यासाठीं असामान्य अशी करामत करायचे. असें हें प्रत्येक देवालयांत चालायचें, तिथेंहि लयकारीचे प्रेमळ वाद चालायचे.

अशी ही इश्वरदत्त अशी लयकारीची देणगी घेऊन अनेक वादनकार नांव काढण्यासाठीं गोव्याबाहेर गेले. आणि कीर्तिवंत झाले. तंतुवाद्यांत सारंगी, दिलरुबा, फिडल आदींवर सफाईने आणि रंजकतेच्या झिलईनें हात फिरवणारे गोमंतकीय नांव गाजवून आहेत.

तबला वादनाबद्दल तर विशेष कांहीं सांगायलाच नको! मास्टर व्हॉइस, ऑल इंडिया रेडियो आदि मान्यवर संस्थाचें प्रथम अनावरण झालें तें गोमंतकीय तबलावादकांकडूनच! याची इतिहास साक्ष देईल. लयभास्कर ही बहुमानाची पदवी संपादन करणारे खांप्रूजी पर्वतकर यानीं तर तालाचे अनंत प्रकार निर्माण केले हें सर्वश्रुत आहे.

तोंडांत त्रितालाच्या सोळा मात्रांचा चक्रताल आणि हातांत तबल्यावर झपतालाचा दहा मात्रांचा चक्रताल वाजविण्याची अद्वितीय तशीच असाध्य अशीच करामत खांप्रूजी करीत असत. तबल्यावर धिम्या त्रितालाचा ठेका चालू ठेवून त्या सोळा मात्रांत उजव्या हातानें आडाचौतालाची सम, डाव्या हातानें एकतालाची सम उजव्या पायानें झपतालाची सम, डाव्या पायानें रूपकाची सम आणि पुन्हा मस्तकानें त्या धिम्या त्रितालाची सम एकाच वेळीं दाखवण्याचें अजब कसब लयकारीच्या पूर्ण ब्रह्मांत रोमरोमीं रात्रंदिवस विचार केलेल्या खांप्रूजी पर्वतकरांशिवाय दुसरा कोण दाखवणार? आज विष्णुपंत शिरोडकर, पंढरीनाथ नागेशकर, यशवंतराव केरकर या लोकांनी आयुष्यभर तबलावादन कलेची साधना चालवलेली आहे. त्यांच्या पावलावर पाऊल टाकून रेडियोंतले श्रीपाद नागेशकर, बोरकर आणि असेच कित्येक तरुण या साधनेसाठीं तळमळत आहेत.

तंतुवादनकारांत दत्तारामजी पर्वतकर, श्रीधर पार्सेकर, केरकर आदि लोकांनीं भावी पिढीला आदर्श निर्माण करून ठेवलेला आहे.

ज्या देवानें जन्माला घालतांनाच गोमंतकीयाना हा नादब्रह्माचा साक्षात्कार घडवला त्यानेंच आतां पुढें त्याच्या विकसनाकडे लक्ष द्यावें हेंच मागणें!

# पिनांग सुशांग सुंग

पिनांग ! छे कोंकणच !
नारळी फोफळी केळींची दाट वनें,
फणसासारखीं दिसणारीं फळें पाहून कोंकणांतच
आहोंत कीं काय असें वाटलें—

चुलीया स्ट्रीटमध्यें पेढीच्या मागल्याच प्रशस्त जागेंत ठाकोरलाल रहातात. आम्ही आंत गेल्याबरोबर लांब रेशमी सदरा आणि धोतर परिधान केलेल्या, शांत, गौरवर्ण चेहेऱ्याच्या, चाळीशीच्या आसपास असलेल्या ठाकोरलालानीं अत्यंत आपुलकीनें आपल्या टेबलाजवळच्या खुर्च्यांवर बसवून घेतलें. अगदीं थोड्या वेळांत आपल्या विशिष्ट व्यक्तित्वाची छाप पाडणारीं अशीं जीं कांहीं थोडीं माणसें मला आयुष्यांत भेटलीं आहेत त्यांत ठाकोरलालांची मी प्रामुख्यानें गणना करीत.

'आज रात्रीं बारापर्यंत म्हणजे बारा पंधरा तासच तुम्हीं पिनांगमध्यें आहांत,' ते म्हणाले, 'पण तेवढ्या वेळांत सबंध पिनांग तुम्हांला दाखविण्याची मी सोय केली आहे. आतां चहा घेऊन माझ्या मोटारींतून तुम्हीं बाहेर पडायचं, आणि तारांच्या दोरखंडानीं पंचवीसशें फूट वर ओढली जाणारी स्वित्झर्लंडमधल्या रेल्वेसारखी डोंगरमाथ्यावर जाणारी जी फ्युनिक्युलर रेल्वे आहे तिनं पिनांगच्या हिल् स्टेशनवर जाऊन दुपारीं दीड दोनपर्यंत इथं जेवायला यायचं. रमण तुमच्याबरोबर येईल तो सर्व कांहीं तुम्हाला दाखवील. दुपारीं जेवणानंतर तीन वाजतां बाहेर पडा, आणि तेरा मैलांवर असलेलं चिन्यांचं सर्पमंदिर वगैरे शहरांत इतर जें कांहीं पहाण्यासारखं आहे तें या मुलाबरोबर पहा.'

'बोटीवर जेवायची वगैरे आमची सर्व सोय आहे, दुपारीं आम्ही—' चांदूरकर बोलूं लागले.

'तें कांहीं सांगूं नका मला.' ठाकोरलाल त्यांना बोलूं न देतां म्हणाले, 'हिंदुस्थानांतून तुम्ही आलांत, आणि आपल्या पंक्तीचा लाभसुद्धां तुम्ही मला देणार नाहीं? माझ्या घरांतली मीठभाकरी जी कांहीं मी तुम्हांला देईन ती तुम्हीं घेतलीच पाहिजे.' त्यांच्या समोर पुढें कांहीं बोलणें शक्यच नव्हतें.

इतक्यांत मसाले घातलेला गुजराथी चहा मुलांनीं आमच्यासमोर आणून ठेवला. पोटाचा त्रास असल्यामुळें ठाकोरलाल फारसा चहा घेत नाहींत. टेबलावरले कागदपत्र चाळीत ते आमच्याशीं बोलत होते. कोपऱ्यांतल्या तिजोरीवर श्रीकमला आणि गणपतीचीं चित्रें फ्रेम करून लावलेलीं होतीं. दुसऱ्या कोपऱ्यांतल्या भिंतीवर गांधीजी आणि जवाहरलाल यांच्या तसबिरी होत्या. खुर्चीच्या मागें भिंतीच्या मध्यावर दुसऱ्या एलिझाबेथ राणीचें चित्र होतें. मलायांत, पूर्वी हिंदुस्थानांत होतें तसें ब्रिटिशांचें राज्य सध्यां दृढमूल आहे या गोष्टीची तें चित्र आठवण करून देत होतें. ठाकोरलालांचा गुळगुळीत स्मश्रू केलेला उजळ चेहेरा सोनेरी फ्रेमच्या चष्म्यांतून समोर पहात धिम्या, शांत, आत्मविश्वासपूर्ण आवाजांत बोलण्याची पद्धति, या सर्व गोष्टी मुंबईचे माजी मुख्यमंत्रि मोरारजीभाई यांचीं क्षणोक्षणीं मला आठवण करून देत होत्या. 'परमेश्वरावर दृढ विश्वास ठेवला आणि सतत काम केलें म्हणजे माणूस श्रीमंत झालाच पाहिजे,' ते आम्हाला सांगत होते. माझें साडेचार गुजराथी इयत्तापलीकडे शिक्षण झालेलें नाहीं, असें ते म्हणाले तेव्हां मला धक्काच बसला! खरेंच आहे ना; कारण केवळ न अडखळतांच नव्हे तर चांगल्यापैकीं इंग्रजींत ते आमच्याशीं बोलत होते. 'बाराव्या वर्षीं मी मलायांत आलों नीं गेलीं अठ्ठावीस वर्षें मलायांत आहे,' ते म्हणाले, 'इंग्रजींतून सारा व्यवहार करावा लागतो तेव्हां संवयीनें इंग्रजी बऱ्यापैकीं येतें इतकेंच.'

हिंदुस्थान आणि जपानहून कापड आयात करण्याचा ठाकोरलालांचा व्यापार आहे. सिंगापूरमध्येंहि त्यांची पेढी आहे. तिथला व्यवहार त्यांचा भाऊ पहातो. दुसऱ्या एका चुलत भावाचा फार मोठा व्यापार मलायांत आहे. त्यांत कित्येक वर्षें ठाकोरलाल पहिल्यांदा भागीदार होते. पुढें पटेनासें झालें तेव्हां ती भागीदारी सोडून गेल्या तीनचार वर्षांपासूनच त्यानीं स्वतंत्र धंदा सुरू केला आहे. "त्यांना मी नकोसा झालों तेव्हां मी बाहेर पडलों,–" ते सांगत होते, "आणि फारकतीच्या कोऱ्या करारावर सही करून दिली.

मलायाचे प्रख्यात बॅरिस्टर रामुन्नी, चौऱ्यांशीं वर्षांचे वयोवृद्ध कायदेपंडित कुमारस्वामी वगैरे आमच्या पेढीचे सल्लागार होते. पण मला कायदा कोर्टें नको होतीं. इतर भागीदारांनीं जें कांहीं थोडें दिलें तें घेऊन मी बाहेर पडलों. दोन-तीन वर्षांत माझा




अनंत काणेकर

उत्तम जम बसला आहे. पहाटेपासून रात्रींपर्यंत मी स्वतः काम करतों. कारकून, मॅनेजर कुणी नाहींत. माझा हा भाचा मोहन आणि तो रमण पांचवी कीं सहावी गुजराथेंत शिकत होते. त्यांना इथें बोलावून घेऊन धंद्यांत घेतले. एक-दोन वर्षांत ते चांगलेच तयार झालेत. इंग्रजी पत्रव्यवहार, टायपिंग वगैरे सर्व कांहीं तेच करतात. बाहेरचे कारकून आणि मॅनेजर हवेत कशाला ? रोज सकाळीं मी नेमानें प्रार्थना करतों, आणि स्नानगृहांत विष्णु सहस्रनाम पुरं करतों. माणसं काम करीत नाहींत म्हणून गरीब रहातात असं माझं स्पष्ट मत आहे ! ”

पिनांगमधल्या रामकृष्ण आश्रमाचे आणि मर्चेंट्स् चेंबरचेहि ठाकोरलाल उपाध्यक्ष आहेत. रामकृष्ण आश्रमाचे स्वामी श्रीसदानंद यांच्याशीं त्यांचा नेहमी पत्रव्यवहार चालतो. पिनांगमध्यें येणाऱ्या बड्या लोकांच्या आदर-सत्कारांत ठाकोरलालांचाच पुढाकार असतो. जपानला जातांना जनरल श्रीनागेश पिनांग-मध्यें उतरले होते. त्यांच्या सत्काराचा मोठा समारंभ ठाकोरलालांनीं केला होता. जवाहर-लाल आणि विजयालक्ष्मी पिनांगला येऊन गेली. त्यावेळचे त्यांना हार घालीत असतानांचे किंवा त्यांच्या समवेत उभे असतानांचे आपले बरेच फोटो त्यांनीं आम्हाला दाखविले.

गेल्या महायुद्धांत १९४२ सालीं मलाया जपान्यांनीं घेतला आणि पुन्हा ब्रिटिश येई-पर्यंत दोन तीन वर्षें मलायांत जपान्यांचेंच राज्य होतें. यांचे काळांत सुभाषबाबूंनीं आझाद हिंद सेना उभी करून सिंगापूर येथें स्वतंत्र भारत सरकारची घोषणा केली. त्या काळांतले ठाकोरलालांचे अनुभव एखाद्या अद्भुतरम्य कथेंत शोभण्यासारखे आहेत. आमच्या समोर बसून शांत धिम्या आवाजांत आमच्याशीं बोलणारा हा हिशेबी व्यापारी गृहस्थ सुभाषबाबूंच्या आझाद हिंद सेनेंत फायनान्स सब् ऑफिसर आणि सिग्नलर म्हणून काम करीत होता. मलाया ब्रह्मदेशाच्या निबिड जंगलांतून त्यांनीं पायपीट केली आणि अनेक प्राणसंकटें त्यांच्यावर आली यावर कुणाचा सहजासहजीं विश्वास बसला नसता.

पिनांगवर जपानचा पहिला वैमानिक हल्ला झाला तेव्हां हजार घरें भस्मसात झालीं. ‘आणि ठाकोरलालांच्या मतें कमींत कमी आठ हजार लोक ठार झाले. सुभाषबाबूंच्या आझाद हिंद सेनेंतून मलाया, थायलँडमधलीं जंगलें तुडवीत ठाकोरलाल ब्रह्मदेशांतील मर्गुईपर्यंत गेले. तिथून आझाद हिंद सेना मणिपूरला पोहोचली. या इथेंच सुभाषबाबूंनीं आपल्या सेनेला उद्देशून तें गाजलेलें भाषण केलें; “ ...त्या तिथें—त्या डोंगरांच्या पलीकडे आपली मातृभूमि आहे...आपण तिला स्वतंत्र करूं किंवा मरून तरी जाऊं... ” जपान्यांचा पराभव झाला आणि आझाद हिंद सेनेची पांगापांग झाली तेव्हां ठाकोरलाल ब्रह्मदेशांत होते. सैनिकांचा गणवेष अंगावर नव्हताच. ब्रिटिश लष्करानें पकडून त्यांची उलट तपा-सणी केली तेव्हां आपणाला इंग्रजी मुळींच समजत नाहीं, कोण काय हेंहि सांगतां येत नाहीं, अशी बतावणी करून सुटले. त्यानंतर बारा महिने ते रंगूनमध्यें होते. आझाद हिंद सेनेंतल्या त्यांच्या हाताखालीं काम करणाऱ्या दहाबारा लोकांना ब्रह्मदेशांतून गुपचूप भारतांत जाव-याला त्यांनीं सहाय्य केलें. सैन्यांतलें काम संपल्यावर त्यांच्यांतला व्यापारी पुन्हां जागा झाला. ‘ बारीकसारीक व्यापार करून ब्रह्मदे-शांतल्या त्या बारा महिन्यांत मी जवळ जवळ बारा हजार रुपये कमावले,’ ते म्हणाले !

ब्रह्मदेशांत आझाद हिंद सेना गेली त्या वेळचा एक रोमांचकारी अनुभव त्यांनीं सांगितला. ठाकोरलाल आणि त्यांच्या बरो-बरचे कांहीं सैनिक मर्तबानच्या आखातांतून एका एका होडीनें पलीकडे जात होते. समुद्रांत मध्यभागीं होडी असतां ब्रिटि-शांची बॉंबफेंकी विमानें आलीं, आणि होडीवर बॉंब टाकूं लागलीं. त्यांच्या बरोबरच्या कांहीं लोकांनीं भीतीनें गांगरून जाऊन पाण्यांत उड्या टाकल्या आणि ते बुडून मेले. ‘ मला पोहतां येत नव्हतें,’ ठाकोरलाल सांगत होते, ‘ तेव्हां स्वस्थ बसून देवाचें नांव कां घेऊं नये असा विचार करून मी शांतपणें रामनामाचा जप करूं लागलों. होडीवर एकही बॉंब नेमका पडला नाहीं. आजूबाजूला पडलेल्या बॉंबनीं पोहत जात होते ते ठार झाले. ”

“ अठ्ठावीस वर्षें मी मलायांत असलों तरी मी अजूनही हिंदी नागरिक आहे आणि माझा पासपोर्टही हिंदी आहे, ” ते म्हणाले, “ माझीं मुलें इथें जन्मलीं, तेव्हां तीं मला-याची नागरीक आहेत. ” मलायांतल्या शिक्षणासंबंधीं बोलत असतां पहिल्यापासून ज्या पेढींत ते भागीदार होते तिचा मालक असलेल्या त्यांच्या भावानें सिंगापूरच्या मलाया विद्यापीठाला चाळीस हजार डॉलरांची म्हणजे जवळ जवळ साठ हजार रुपयांची देणगी दिल्याचें त्यांनी सांगितलें. “ माझेच पैसे त्यानें देणगी म्हणून दिले असं म्हटलं पाहिजे,” ते मिस्किलपणें म्हणालें, “ कारण फारकतीच्या वेळीं माझ्या न्याय्य वाट्याचे पैसे मला मिळाले नव्हते ! ”

इतक्यांत शोफर मोटर घेऊन आल्याचा निरोप आला. दहा वाजले होते. हिलस्टेशन पाहून दुपारी एकदीडला परत यायचें म्हणजे आतां बाहेर पडायलाच हवें होतें. आमच्याबरोबर रमण येणार होता. मोटारीजवळ शोफर उभा होता. ठेंगणासा, दणकट मजबूत बांध्याचा तो कृष्णवर्ण शोफर तामीळ असावा, असें आम्हाला वाटलें. आम्ही त्यांच्याशीं कांहीं तरी हिंदींत बोलूं लागलों. ठाकोरलाल हंसून म्हणाले, “ अहो, त्याच्याशीं हिंदींत कशाला बोलतां ? तो तुमचा मराठी माणूस आहे ! ”

“ अरेच्या ! ” मी म्हणालों, “ काय हो, तुम्हीं कुठले ? ”

“ मी जतचा, आप्पा हणमाने ! ” तो मर्द मराठा म्हणाला, “ पलटणींतून सुटलों नी ह्यांच्याकडे ऱ्हायलों. ”

“ अस्सं ? ” मी विचारलें, “ आणखी मराठी लोक इथं पिनांगमध्यें कुणी आहेत का ? ”

“ हितं न्हाईत, ” तो म्हणाला, “ पन् पूर्वी पलटनींत असलेले आपले तीस मराठे लोक सिंगापूर पोलीसांत हायेत्. ”

पिनांगचे डोंगर शहराच्या दुसऱ्या टोंकाला आहेत. डोंगरांच्या पायथ्याशीं असलेल्या हिल् रेल्वेस्टेशनाकडे जाण्याकरतां जुनें शहर मागें टाकून नव्या उपनगरांवरून जावें लागतें. जुन्या शहरांतून बाहेर पडल्याबरोबर स्वच्छ लांबरुंद रस्ते आणि भोंवतीं हिरव्यागार बागा असलेलीं छोटीं छोटीं टुमदार घरें दिसूं लागलीं. एका रस्त्यावर भल्यामोठ्या विस्तीर्ण हिरव्यागार आवारांत एक प्रशस्त लांबच लांब इमारत दिसली. या इमारतींतल्या मजल्यावर

जवळ जवळ खिडक्या दारें नाहींत कीं काय असा भास उत्पन्न करणारीं मोठमोठीं उघडीं दालनें दिसत होतीं. रमण म्हणाला, 'हें चिनी मुलांचें हांचँग हायस्कूल. इथल्या उष्ण हवेंत मुलांना त्रास होऊं नये आणि वारा खेळता रहावा म्हणून हे असे प्रशस्त उघडे वर्ग ठेवले आहेत.' मोठमोठे घड्याळाचे मनोरे असलेल्या, चुंगलिंग हायस्कूल, चिनी मुलींचें हायस्कूल वगैरेंच्या भव्य इमारती पुढें दिसल्या. मलायांत मलायी लोकांइतकेच चिनी आहेत इतकेंच नव्हे तर मलायांतले बरेचसे उद्योगधंदे, व्यापार वगैरे त्यांच्याच हातीं आहे. त्यामुळें इथला सधन वर्ग चिन्यांचाच आहे. शाळाकॉलेजांसाठीं मोठमोठ्या इमारती त्यांनीं बांधल्या आहेत. बागबगीचे असलेलीं टुमदार सुंदर घरें चिन्यांचींच होतीं. रस्त्यावर हातगाड्यांतून शेंगा, केळीं किंवा मटनमाशांचे खाद्य पदार्थ विकीत फिरणारे चिनीच होते. बरींचशीं सोडालेमन चहाचीं दुकानें चिन्यांचींच दिसत होतीं. पहावें तिथें चिनी स्त्रीपुरुष किंवा अधूनमधून आमचे तामीळ हिंदीभाई दिसत होते. 'हा मलाया ना?' मी रमणला विचारलें, 'मग मलायी लोक कुठं आहेत? रस्त्यांत, दुकानांत तर कुणीय मलायी दिसत नाहींत.'

'आहेत तसे मलायी,' तो म्हणाला, 'पोलिसांत किंवा मजूरांत दिसतील थोडे तुम्हाला, पण पिनांग किंवा सिंगापूरसारख्या शहरांत चिनी फारच आहेत. मलायाच्या मुख्य भूमीवर खेड्यापाड्यांत मलायी लोक ज्यास्त दिसतील.'

स्वच्छ पांढऱ्या भिंती आणि निळ्या रंगाचे खांब, खिडक्या असलेली एक लांबचलांब नवी इमारत, मांस आणि मासे विकण्याचें मार्केट आहे असें कळलें तेव्हां आश्चर्य वाटलें. मार्केटाची इतकी स्वच्छ आणि सुरेख इमारत आतांपर्यंत मी कुठें पाहिलेली नव्हती. एका, एकमजली प्रशस्त हॉटेलांत टेबल खुर्च्याभोंवती स्वच्छ पांढरे कपडे घातलेले बरेचसे चिनी वावरत असलेले दिसले. रंगीबेरंगी कागदाचे चिनी दिवे हॉटेलच्या भोंवती ठिकठिकाणीं लटकवलेले होते. कुणातरी चिन्याच्या लग्नाची मेजवानी तिथें होती. आतां इमारती तुरळक झाल्या होत्या. समोर हिरव्यागार डोंगरांच्या रांगा दिसत होत्या. आम्ही गांवाबाहेरच्या खुल्या भागांत आलों होतों. भव्य वृक्षांची हिरवीगार झाडी आणि नारळी–पोफळींची दाट वनें पहावें तिथें दिसत होतीं. विषुववृत्ताजवळच्या या प्रदेशांत बारा महिने एकच ऋतू असतो म्हणे. ऊन कडक पडतें; पण दररोज किंवा फार तर एकदोन दिवसांआड दुपारीं चार पांच नंतर पाऊस पडून जातो. त्यामुळें रस्त्यांत धूळ कुठें दिसत नाहीं. बारा महिने जिकडे तिकडे हिरवेंगार गवत आणि गर्द काळसर हिरवी झाडी दिसते. हें पाहून इंग्लंडमध्यें आल्यासारखा पहिल्यांदा भास होतो; पण इंग्लंड जितकें बारा महिने थंड तितकेंच इथें बारा महिने ऊष्ण! नारळी–पोफळी केळींची दाट वनें, फणसासारखीं दिसणारीं फळें पाहून कोकणांत आहों असें



वाटतें. कोंकणांत नव्हे महाकोंकणांत—कारण इथल्या नारळी पोफळी केळी कोंकणांतल्यापेक्षां संख्येनेंच नव्हे तर आकारानेंहि मोठ्या आहेत. लालसर पिवळ्या रंगाचा भला मोठा रुंदट गोल नारळ, काळसर हिरव्या रंगाच्या लांबलांब पानांच्या भल्या मोठ्या केळी. आपल्याकडल्या नारळी पोफळी लहान आणि त्यांचे बुंधे जुनाट काळसर दिसतात. इथें बारा महिने पाऊस असल्यामुळें कीं काय बुंधे भरदारच नव्हे तर स्वच्छ पांढरट काळे ताजे टवटवीत दिसतात, म्हणून हें महाकोंकण! या पिनांगमध्यें पोफळी फार. 'पिनांग' या शब्दाचा अर्थच मुळीं मलायी भाषेंत सुपारी आहे म्हणे. 'पिशांग' म्हणजे केळी. 'बुंगा' म्हणजे फूल. हां हां म्हणतां बरेंच मलायी शिकलों मी!

हिल रेल्वेस्टेशनच्या दाराशीं येऊन पोहोचलों तेव्हां साडे अकरा वाजले होते. आज रविवारचा दिवस असल्यामुळें डोंगरमाथ्यावर हवेच्या ठिकाणीं सहलीकरतां जाणारे बरेच चिनी विद्यार्थी आणि खाद्यपेयांनीं भरलेल्या वेताच्या टोपल्या बरोबर असलेलीं तरुण चिनी जोडपी स्टेशनांत दिसत होतीं. स्टेशनच्या आवारांत चिनी पोरें आईस्-फ्रूट विकीत होतीं. दर पंधरा मिनिटांनीं वर जायला गाडी असते. पहिल्या वर्गाचीं तिकिटें रमणनें घेतलीं; आज सुट्टीचा दिवस म्हणून तिकिट निम्मे दरानें मिळालें. पंधरावीस मिनिटेंच गार्डीची वाट पहात स्टेशनांत उभें रहावें लागलें; पण तेवढ्यांत घामाच्या धारा वाहूं लागल्या. सगळें हिरवेंगार आहे पण थंड नाहीं! स्टेशन चिमुकलें आहे, दोनच रूळ आणि पाण्याचे पाईप डोंगरावरून सरळ खालीं येतात तसे. इंजिनाच्या गाडीसाठीं थोडा थोडा चढ असलेला रस्ता डोंगराच्या बाजूबाजूनें वळणें घेत घेत करावा लागतो. ही गाडी तारेच्या भल्या मोठ्या दोरखंडानें सरळ पंचवीसशें फूट म्हणजे खंडाळ्याच्या घाटापेक्षांही उंच—वर ओढली जाते; म्हणून पाईपासारखे सरळ रूळ टाकलेत. दोनचार डब्यांची गाडी चढत्या रूळावर तिरकसच उभी असते. रुळांच्या मध्यें फूट फूट रुंदीच्या भल्या जाड कप्प्या दहा दहा फूट अंतरावर आडव्या असतात. त्यांच्या वरून जाणाऱ्या जाडजूड तारांचे दोरखंड डब्यांना विजेच्या शक्तीनें वर ओढतात.

ब्रेकची वगैरे व्यवस्था अशी कांहीं आहे कीं दोर तुटले तरी गाडी घसरून कोसळणार नाहीं. स्टेशनांतले खाकी कपड्यांतले बहुतेक नोकर चिनी किंवा तामीळ दिसले. दरवाजाशीं उभा असलेला दरवान दाढीवाला शीख होता. खाकी शॉर्ट आणि शर्टमधला, डोक्यावर मुंबईच्या ट्रॅम-कंडक्टरच्या सारखी वाटोळी काळी टोपी असलेला पोलीस मात्र गुरख्यासारखा दिसणारा मलायी होता.

(अपूर्ण)





तिबेट म्हणजे भारताचा प्राचीन शेजारी. या दोन राष्ट्रांत हिमालयासारखा महापर्वत आडवा येऊन सुद्धां दोघांच्या परस्पर स्नेहसंबंधांत कधींच अंतर पडलेलें नाहीं.

—दलाई लामाचें नाट्यपूर्ण पलायन आणि त्याला भारतानें दिलेला आश्रय या घटनेमुळें हे जुने संबंध परत उजळले गेले आहेत. आणि—

# लामांच्या देशांत

दलाई लामाला आज भारतानें आश्रय दिला यासाठीं आम्हीं पाठ थोपटून घेण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट तिबेटी जनतेच्या उपकाराची ही परतफेडच आहे. पांचव्या शतकांत कोसलचा राजा प्रसेनाजित याचा पांचवा मुलगा बापाशीं भांडण करून तिबेटांत पळाला आणि तिबेटी लोकांनीं त्याला आश्रय दिला. पण या कोसलदेशीय राजपुत्रानें तेथील टोळ्यांच्या प्रमुखांचें मन जिकलें आणि तिबेटचें राज्य मिळवलें असें इतिहास सांगतो. यानंतर तिबेटवर अनेक राज्यकर्त्यांनीं राज्य केलें पण तिबेटच्या सामाजिक वा आर्थिक प्रगतीबाबत कोणीच लक्ष दिलें नाहीं. तिबेट हा भारताचा निकट शेजारी, पण दोघांच्या वाटेंत हिमालय अक्षरशः आडवा भालेला. तथापि भारतीय धर्मप्रसारकांनीं तिबेटांत जाण्याची जिद ाडली नाहीं. इ. स. १०१३ मध्यें अनेक संकटांना तोंड देऊन ेत धर्मपाल आपल्या अनेक शिष्यांसमवेत तिबेटांत गेला. त्याच्या गोमाग १०४२ मध्यें आतिश या पंडितानें तिबेटी धर्मगुरूंकडूनहि ा-ओ रिम-पोचे ( अधिराज ) अशी पदवी मिळवली. आतिशनें ‌ावेटी भाषा मुखोद्‌गत केली आणि तेथील अनेक ग्रंथांचें भाषांतरहि ठलें. पण तिबेटी लोकांना परकीयांची आवक जावक कदापि पसंत नव्हती. १४७६ मध्यें तिबेटच्या गादीवर पहिला लामा स्थानापन्न झाला. त्याच्या मागोमाग जो तिसरा लामा तिबेटच्या गादीवर आला त्याला ' दलाई लामा वज्राधारा ' ही पदवी बहाल करण्यांत आली.

तिबेटचें आध्यात्मिक आणि राजकीय नेतृत्व करणाऱ्या या दलाई लामांनीं तिबेटला पाश्चात्य सुधारणांचा मागमूसहि लागूं दिला नाहीं. वाहातुकीचा मार्ग अति बिकट आणि बर्फमय, वादळें, यामुळें तिबेटच्या मुख्य राजधानीपर्यंत म्हणजे ल्हासापर्यंत जाणें ही अवघड गोष्ट होती. तथापि असल्या संकटांची परवा न करतां धर्मप्रसार, प्रवासाची दुर्दम्य आवड, औत्सुक्य इत्यादि अनेक कारणांमुळें युरोपियन प्रवाशांनीं तिबेटची वाट कधीं सोडली नाहीं. तिबेटमध्यें पहिलें पाऊल ठेवण्याचा पहिला मान अंतोनियो डी अंद्राद या पोर्तुगीज रहिवाशाकडे जातो. त्यानें चिकाटी धरली पण तो ल्हासापर्यंत पोचूं शकला नाहीं. १६६१ मध्यें ल्हासापर्यंत पोचण्याची बिकट कामगिरी दोघां जेसुईट पाद्र्यांनीं पार पाडली. त्यानंतर असंख्य युरोपियन प्रवाशांनीं तिबेटला भेटी दिल्या. त्यांतल्या कांहीं चिकित्सकांनीं तिबेटी जनता, त्यांची भाषा आणि संस्कृति याचें सूक्ष्म अध्ययन करून तिबेटविषयक वाङ्मयांत बहुमोल भर टाकली.

साम्राज्यपिपासू ब्रिटीश सरकारला तिबेटबद्दल नेहमींच औत्सुक्य वाटत होतें. तिबेटची माहिती गुप्तपणें काढून घेण्यासाठीं ब्रिटीश सरकारनें १८६३ मध्यें पंडित न्यानसिंग या हेराला ल्हासाला पाठविलें. या चतुर माणसानें अनेक जिवावरच्या प्रसंगांना तोंड देऊन तिबेटचे सर्व मार्ग, मोक्याचीं ठिकाणें, त्यांचा नकाशा, तेथील लोक आणि त्यांच्या चालीरिती यासंबंधीं मोठी मनोरंजक आणि उपयुक्त माहिती गोळा केली.

यानंतर तिबेटशीं समझोता करावा म्हणून सशस्त्र सैनिक बरोबर देऊन एक शिष्टमंडळ भारत सरकारनें १९०३ मध्यें ल्हासा येथें पाठविलें. या शिष्टमंडळाच्या आंतरिक हेतूबद्दल शंका निर्माण झाल्यामुळें दलाईलामानें या शिष्टमंडळाची भेट घेण्याचें नाकारलें आणि त्यांची साभार बोळवण केली. शेवटीं १९०४ मध्यें भारत सरकारनें एक लष्करी तुकडी ल्हासा येथें पाठविली. त्यामुळें भयानें लामा मंगोलियांत पळाला. शेवटीं लामा आणि भारत सरकार यांचा तह झाला.

ब्रिटिश सरकारच्या या हालचालीवर चिनी सरकारचा डोळा होताच. तिबेटसारखा प्रांत ब्रिटिशांनीं घशांत घातला तर चीनचें स्वातंत्र्य धोक्यांत येईल असें जाणून १९१० मध्यें चिनी सरकारनें तिबेटमध्यें लष्करी कारवाई केली. यावेळीं दलाई लामानें मोठें नाट्यपूर्ण पलायन केलें आणि तो दार्जिलींग येथें आला. भारत सरकारनें त्याचें अगत्यपूर्वक स्वागत केलें आणि एखाद्या शाही पाहुण्यासारखी त्याची बडदास्त ठेवली. इतक्यांत १९११ मध्यें चीनमध्यें लष्करी क्रांति झाली, त्याचा फायदा घेऊन तिबेटी जनतेनें चिनी लोकांना हुसकावून लावलें आणि दलाई लामा पुनरपि ल्हासा येथें परतला.

ब्रिटिश सरकारच्या या उपकारांची, दलाई लामानें आठवण ठेवून पहिल्या महायुद्धांत १००० तिबेटी सैनिक ब्रिटिशांचा मदतीस पाठवले. १९२० मध्यें त्यानें ब्रिटिश सरकारला आपला प्रतिनिधी

ल्हासा येथें पाठविण्याची विनंति केली. तिबेटच्या इतिहासांतील हा पहिला आमंत्रित गोरा माणूस. सर चार्लस वेल नामक या प्रतिनिधीचें लामानें प्रेमपूर्वक स्वागत केलें आणि १९२२ मध्यें तिबेटच्या इतिहासांत प्रथमच तिबेट भारत तारायंत्राचें दळणवळण सुरू झालें.

१९३३ मध्यें १३ वा दलाईलामा वारला आणि लिंगन्ह लामुंटाची या मुलाची लामा म्हणून नियुक्ति करण्यांत आली. या प्रकरणीं पेकिंग सरकारनें मोठा उत्साह दाखविला. १९४० पासून १४ वा दलाई लामा गादीवर आला आणि त्या वेळेपासून पेकिंग आणि ल्हासा यांचे संबंध उत्तरोत्तर दृढ होत गेले.

या दृढ संबंधांचा फायदा घेऊन तिबेटी जनतेची सर्वांगीण सुधारणा करण्याच्या मिषानें रस्ते सुधारणा, पूल बांधणीं, शाळांची स्थापना, प्रौढ साक्षरता वर्ग, सोन्याच्या खाणीची दुरुस्ती, घरबांधणी, हे नवे कार्यक्रम पेकिंग सरकारनें हातीं घेतले. या नव्या तडकाफडकी सुधारणा तिबेटी मनोवृत्तीला चटकन् आकृष्ट करणाऱ्या नव्हत्या आणि पारंपारिक संशयी स्वभावामुळें पेकिंग सरकारच्या उदात्त हेतूबद्दलहि सर्वसामान्य तिबेटीयांत सांशंकतेची भावना निर्माण झाली, आणि त्यांतून पुढील घटना उद्‌भवल्या.

आर्थिक आणि सामाजिक बाबतींत तिबेट मागासलेला असला तरी भौगोलिक उंचींत तो जगांतील सर्व देशांत अग्रगण्य आहे. त्याची कमीतकमी उंची १६००० फूट आणि जास्तींत जास्त उंची पंचवीस हजार फूट आहे. महाराष्ट्राची जास्तींत जास्त भौगोलिक उंची पांच हजार फूट आहे हें ध्यानीं आणल्यास तिबेट हा जागतिक उच्चांकांत कोणासच हार जाणार नाहीं हें ध्यानीं येईल.

भारताला सुवर्णभूमि म्हणत पण तिबेट अक्षरशः सुवर्णभूमि आहे. तिबेटांत सर्वत्र सोनें सांपडतें, आणि तेहि समप्रमाणांत. हिमालयाच्या खांद्यावर खेळणाऱ्या या प्रदेशाची हवा कडक थंड आणि त्यामुळें सातू, गहू आणि फळफळावळ याखेरीज फारसें पीक नाहीं. प्रदेश बर्फमय असला तरी चिनी सरहद्दीवर जंगलाची वाण नाहीं आणि त्यामुळें अस्वलें, चित्ते, कोल्हे, लांडगे, माकडें हे प्राणी विपुल. पण याक हें जनावर म्हणजे तिबेटची कामधेनू. याकचें मटण, बौद्धधर्मीय असूनहि कडक थंडीमुळें खावेंच लागतें. सातूच्या पिठाची भाकरी, आणि श्रीमंत लोकांनीं केव्हांतरी चैन म्हणून भात खावा. पण रावांपासून रंकापर्यंत लोकप्रिय म्हणजे चहा. चहाच्या विटा पाण्यांत उकळायच्या आणि नंतर त्यांत लोणी व मीठ घालून हा चहा ताकासारखा घुसळायचा. असा लोकविलक्षण चहा—साधारणपणें दिवसांतून ३० ते ५० कप सहज पिणें हें तिबेटी माणसाचें व्यसनच आहे. याच्या जोडीला सातूपासून केलेली बीअर सारखी सौम्य दारू शेतकऱ्यांची सायंकाळ मोठ्या मजेंत घालवते.

तिबेटमध्यें स्त्रियांना फार मान मिळतो आणि दिला जातो ही आश्चर्याची पण सत्य गोष्ट. प्राचीन काळीं तिबेटचे तुकडे झाले तेव्हां टोळ्यांचें आधिपत्य स्त्रियांकडेच आलें. पण आज सुद्धां स्त्रियांची ही हुकमत कायम आहे. सर्व अधिकारी आपल्या कामकाजांत नेहमीं बायकोचा सल्ला घेतातच. पण हें लग्नानंतर. लग्नापूर्वी मुलीच्या पसंति नापसंतीचा कांहीं विचार केला पाहिजे किंवा करण्याची गरज, तिबेटी पालकाला वाटत नाहीं. पांच पांडवांची द्रौपदी भारतांत पुराणजमा झाली असली तरी तिबेटांत अशा द्रौपदी आजहि अनेक सांपडतात आणि त्याला लोकमान्यता आहे.



बसक्या नाकाच्या आणि पिंगट डोळ्याच्या या बळकट तिबेटी लोकांची जास्तीत जास्त उंची साडेपांच फूट. त्यांचे दांत वेडेवांकडे पण बळकट. खांदे जबरदस्त आणि गालहाडे बरीच वर आलेलीं. त्यांच्यांत मध्यमवर्ग जवळजवळ नाहींच. सरंजामी सरदारांचे प्राबल्य अजूनहि गेलेलें नाहीं. आज ल्हासा येथें पा. ल्हा या नावाचें एक मोठें सरदार घराणें आहे. प्राचीन काळीं मूळपुरुषानें राजाला कांहीं अडीअडचणीच्या प्रसंगीं मदत केली त्यामुळें आज त्यांच्या मालकीचीं १४०० शेतें, ३३ कुरणें आहेत. सरकारला धान्य आणि पैशाच्या रुपानें खंडणी द्यावची. आपले शेतमजूरहि कधीमधीं कामाला पाठवावयाचे आणि आपल्या घरांतील एक दोन कर्ते तरुण सरकारी अधिकाराच्या पदावर नाममात्र पगारावर काम करायला पाठवावयाचे असा आजहि शिरस्ता.

याशिवाय लामा ज्या शेतकरी कुटुंबांत जन्माला येतो त्या कुटुंबालाहि सरदारकी आणि भलीमोठी शेतवाडी बहाल केली जाते.

चैन करणें, जुगार खेळणें, नाचगाणीं, नाटकें हे तिबेटी जनतेचे आवडते छंद असले तरी धर्माची त्यांच्यावर जबरदस्त मोहिनी आहे. साधु ज्योतिषी यांना फार मान. पत्रिका पाहण्याचा त्यांचा नाद फार जुना. दलाई लामाचेहि राजज्योतिषी आहेत. पत्रिका जुळल्याशिवाय तिबेटी पालक लग्नें जुळवत नाहींत ही माहिती मराठी माणसाला आपुलकीची वाटेल.

धर्मावर जबरदस्त विश्वास असल्यामुळें दलाई लामाचें फार मोठे प्राबल्य. तो ल्हासा येथील राजवाड्यांत राहातो. त्याचा दुसरा शासनाधिकारी म्हणजे पंचन लामा. याच्या हालचालीवर दलाई लामाचें नेहमींच लक्ष असतें. दलाई लामाचा एक चीफ सेक्रेटरी शिवाय पंतप्रधान आणि त्याचे सहकारी यांच्या निर्णयांना डावलून एखादी गोष्ट करण्याची दलाई लामाला सर्वस्वी मुभा आहे. कारण निर्वाणाचा अधिकार असूनहि केवळ तिबेटी लोकांसाठीं त्यानें पुनर्जन्माच्या यातना स्वीकारलेल्या असतात—असा तिबेटी जनतेचा पुरेपूर विश्वास आहे.

ही श्रद्धा आणि हा विश्वास हेंच या भाबड्या जनतेचें मोठें बळ आणि मोठी उणीव.

—श्रीकृष्ण ठाकूर.

—०—

अनुक्रमणिका

( पान ९ वरून चालू )

या मूर्ति विषकन्यांच्या असाव्यात असें माझें अनुमान आहे.

अर्थशास्त्रांत विषकन्येचा उल्लेख आढळत नाहीं. मुद्राराक्षसांत विषकन्या आहे. राक्षसानें चंद्रगुप्ताला मारण्यासाठीं विषकन्या पाठवली, पण त्याला मारण्याऐवजीं त्याचा प्रतिस्पर्धी जो पर्वतेश्वर याचा तिनें चाणक्याच्या कारस्थानामुळें वध केलेला आहे. परिशिष्ट असें पर्वांत सांगितलें आहे.

चंद्रगुप्त व पर्वत हे राजवाड्यांतील संपत्तीचीं वांटणी करूं लागले तेव्हां त्यांचा नाश करण्यासाठीं नंदानें जामदारखान्यांत विषकन्या पाठवली. तिला पाहतांच पर्वत लुब्ध झाला. ती विषकन्या आहे हें चाणक्यानें ओळखलें आणि ती त्याच्या वांट्याला दिली. पर्वतानें तिचा हात धरला आणि त्यांचा घामांत घाम मिळतांच, अंगात विष भिनून तो मेला. संभोग, दंतव्रण, चुंबन, स्पर्श, निःश्वास व दृष्टिक्षेप अशा या विषकन्यांच्या विषाराच्या प्राणापहारकतेच्या चढत्या पायऱ्या असाव्यात, असें दिसतें.

'ओशन् ऑफ स्टोरी' या कथासरित्सागराच्या श्री. पेंझर व श्री. टॉने यांच्या इंग्रजी भाषांतराच्या दुसऱ्या भागाला 'पॉइझन् डॅमेसेल्स्' या विषयाची सांगोपांग चर्चा करणारें परिशिष्ट जोडलेलें आहे. त्यांत विषकन्यांच्या निर्मितीचे प्रयोग सांगितलेले आहेत. तोंडाला किंवा पोटाला कोठें कांहीं ओरखडा नसणारानें नागाच्या विषाचें सेवन केलें तर त्याला कांहीं अपाय होत नाहीं. आणि अशा विषाचें वाढत्या प्रमाणांत रोज सेवन केलें तर त्याला नागाच्या दंशानेंहि अपाय होत नाहीं. गारुडी लोक या पद्धतीचा अवलंब करतात. शिवाय विषकन्या तयार करण्यासाठीं मुसलमान लोक विषारी वनस्पतींचा उपयोग करीत असावेत असें दिसतें. विषारी पाला प्रथम पाळण्याखालीं, नंतर गादीखालीं आणि नंतर अंगालगत ठेवावयाचा, पुढें त्याचा रस तिला अल्प प्रमाणांत दुधांतून व अन्नांतून देत देत तिची विषाराची प्रतिकारक्षमता व प्राणहारकता वाढवावयाची, अशी पद्धत एका अरबी ग्रंथांत सांगितलेली आहे.

विषकन्या प्रत्यक्षांत अस्तित्वांत होत्या किंवा कसें, कोण जाणे. त्यांची निर्मिति प्राचीन किंवा मध्ययुगीन सम्राटांनांच परवडणार हें उघड आहे. बिचाऱ्या विषकन्येची स्वतःच्या संवर्धित शक्तिविषयीं काय प्रतिक्रिया असेल याचा अंदाज होत नाहीं आणि कल्पनाहि सहन होत नाहीं !

सर्व विषांत नागाचें विष भयंकर. म्हणून नाग हें विषशक्तीचें प्रतीक. शंकरानें हलाहल प्राशन केलें म्हणून त्याचा कंठ किंवा वर्ण निळा झाला. हें चित्रांत रंगांनीं दाखवतां येईल; शिल्पांत व चित्रांतही हीच कल्पना व्यक्त करण्यासाठीं नागांची योजना केलेली असते. तशी योजना या मदनिका व सुरसुंदरी यांच्या मूर्तींत प्रत्ययास येते, म्हणूनच मला वाटतें या मूर्ति विषकन्यांच्या असाव्यात. त्यांच्या शक्तींचें कमी अधिक प्रमाण किंवा विषाराची भिन्नता दर्शविण्यासाठींच पाल व विंचू या प्रतीकांची योजना केलेली असावी.

आणि हें मान्य झालें तर म्हणायचें कीं आमच्या शिल्पकारांनीं निर्मिलेलें हें प्रतीक त्यांच्या योजकतेला भूषणावह आहे.

—✻—



## भेटलीस तूं

भेटलीस तूं आणि हासलिस<br>
मम जीवाला काय वाटलें ?<br>
चमचाभर चांदणें कुणितरी<br>
अंगावरतीं हळुच शिंपलें !

—शंकर वि. वैद्य

## आमचें शिक्षण



आमच्या घरची शिक्षणाची पद्धत अगदीं जुनाट तऱ्हेची होती. बालबोध अक्षर आणि संस्कृत भाषा मात्र शिकायची. मोडी अक्षर हेमाडपंतानें लंकेंतून राक्षसाकडून आणलें, म्हणून ती राक्षस लिपि, ती शिकायाची नाहीं. प्राकृत भाषेंतील ग्रंथ म्हणजे तुकाराम, रामदास एकनाथ इत्यादि कवींनी केलेले ग्रंथ अलीकडच्या मनुष्यांनीं रचलेले. ऋषींनी केलेले नव्हते ते वाचल्यानें कांहीं पुण्य प्राप्त होत नाहीं. उलट पाप मात्र लागते, म्हणून ते शिकायचे नाहींत. संस्कृत भाषा शिकायची रीत-भाषेंतील व्याकरण, अमर कोश, काव्यें, नाटकें वगैरे ग्रंथ आधीं तोंडपाठ करायचें मग सवडी प्रमाणें त्यांचा अर्थ शिकायचा. वेदमंत्र स्त्रियांनी उच्चारूं नयेत अशी आमच्या वडिलांची पक्की समजूत होती. म्हणून आम्ही त्यांच्या लेकींनी वेदाक्षरांचें उच्चारण करूं नये यासाठीं ते पुष्कळ खबरदारी घेत असत.

—पंडिता रमाबाई



*महाराष्ट्राचे समर्थ आणि सव्यसाची लेखक* **पु. भा. भावे** *यांनी*

# घातली ही पाणपोई

माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तरें तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. एरंडाचें गुन्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच ! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचें पारितोषिक देणार आहोत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल श्री. प. स. शिंदे, नागपूर यांना पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीने पैसे पाठविले जातील.

**श्री. प. स. शिंदे**—धरमपेठ, नागपूर.

**प्रश्न—कम्युनिस्ट पोटाचा प्रश्न कसा सोडवितात ?**

**उत्तर**—डोकीं तोडून. डोकें गेलें कीं पोट जातें.

**प्रश्न—चिनी सैन्य तिबेटांत कसें गेलें ?**

**उत्तर**—रशियन सैन्य हंगेरींत जसें गेलें तसेंच.

**प्रश्न—चिनी सैन्याचे डोळे भारताकडे सुद्धां लागले असतील काय ?**

**उत्तर**—तें, चीनकडे डोळे लावून बसलेल्या येथील लाल पिसाळांना विचारा.

**प्रश्न-कम्युनिस्ट, मिरासदार वर्गाचा नाश करतात काय ?**

**उत्तर**—होय; व ते स्वतःच त्या मिरासदारांची जागा घेतात.

**प्रश्न—कम्युनिझममुळें राहणीचें मान फार उंचावते हें खरें काय ?**

**उत्तर**—फार उंची जीवन जगणाऱ्या डांग्यांसारख्या कांहीं कम्युनिस्ट पुढाऱ्यांचे बादशाही राहणीमान पाहिलें म्हणजे असें वाटतें खरें !

**प्रश्न—कम्युनिस्ट राज्यांत कष्टकरी राज्य करतात काय ?**

**उत्तर**—नाहीं. कष्टकरी कष्ट करतात व कम्युनिस्ट राज्य करतात.

**प्रश्न—कम्युनिस्टांचा धर्मावर विश्वास नसतो हें खरें काय ?**

**उत्तर**—नाहीं. कारण कम्युनिझम हाच एक धर्म आहे. मॉस्को ही त्यांची मक्का आहे. मार्क्स हा त्यांचा पैगंबर आहे. "दास कॅपिटल" हा त्यांचा धर्मग्रंथ आहे. लेनिन-स्टॅलिन-क्रुश्चेव ही त्यांची "पवित्र त्रिपुटी" (Holy Trinity) आहे. ट्रॉट्स्की व टीटो ह्या सारख्यांना हा लाल धर्म पाखंडी व धर्मलंड मानतो. अशा पाखंड्यांचा ह्या पंथांत वाटेल तितका छळ होतो. त्यास अपंग करण्यांत येतें—बहिष्कृत करण्यांत येतें. त्याचें "ब्रेडकार्ड" छिनावण्यांत येतें, वा त्याचे प्राणहि घेण्यांत येतात. क्रेमलिन पीठांत ह्या धर्माचें सर्वेसर्व वसती करून असतात. राजा व धर्मगुरू ह्या दोहोंचे एकत्रित अधिकार हे पुण्यपुरुष भोगत असतात. ह्या पिठाचा अधिकार अमर्याद आहे. व ह्या पंथाच्या असहिष्णुतेला मर्यादा ठाऊक नाहींत. तलवार व अग्नीचाच हा पंथ आहे. एक तर तुम्हीं कम्युनिझमचा कलमा पढला पाहिजे अथवा कापले तरी गेले पाहींजेत. कुठल्याहि एक पुस्तकवादी व एक प्रेषितवादी धर्मांत शोभेल इतकी असहिष्णुता, अंधश्रद्धा, अनाचार व अत्याचार ह्या पंथांत सांपडतात. आणि हा निर्बुद्धांचा धर्म अन्य धर्मांनां तुच्छ देखील लेखतो.



**श्री. अरविंद शंकर करंदीकर**, बोरिवली

**प्रश्न—स्त्रियांना समानहक्क देण्याबाबत आपलें काय मत आहे ?**

**उत्तर**—स्त्रियांना समान हक्क देवूं नयेत. त्यांत त्यांची हानी आहे. चांगल्या स्त्रियांना संपूर्ण अधिकार दिले पाहिजेत, पन्नास टक्के नव्हे, शंभर टक्के.

**कु. माधुरी गुजर**, कराड

**प्रश्न—स्त्रिया आजकाल डोक्यावरून पदर घेत नाहींत. याचें कारण काय ?**

**उत्तर**—पदर घेण्यासाठीं डोकें असावें लागतें.

**सौ. विजया मित्रगोत्री**, सोलापूर

**प्रश्न—स्त्री ही मातृत्वाची गंगा आहे की पत्नीप्रेमाची सिंधू आहे ?**

**उत्तर**—ती अकारण आसवांची गंगा-यमुना आहे.

**श्री. मधु गाडेकर**, वरळी, मुंबई १८

**प्रश्न—उतार वयांत माणसांच्या केसांना पांढराच रंग कां येतो ?**

**उत्तर**—डोळे पांढरे होण्याची ती पूर्वसिद्धता असते.

**सौ. लीलावती पटेल**, डिलाइल रोड भायखळा, मुंबई २७

**प्रश्न—प्रेमकथा भारूडे लिहिणारे कादंबरीकार समाजाला बिघडविणारे पहिले गुन्हेगार नाहींत काय ?**

**उत्तर**—नाहीं, ते दुसरे गुन्हेगार आहेत. प्रेम करणारे हे पहिले गुन्हेगार.

अनुक्रमणिका

**प्रश्न—मनुष्यानें कोणावर भरवंसा ठेवावा ? पत्नी कीं मित्र ?**

**उत्तर**—पत्नीच्या विषयांत मित्रावर विश्वास ठेवूं नये व मित्राच्या विषयांत पत्नीवर विश्वास ठेवूं नये.

**श्री. रमेश वंडू पाटील**—आगरबाजार मुंबई २८.

**प्रश्न—खरा मित्र कोणाला म्हणावें ?**

**उत्तर**—( १ ) जुनी व्याख्या–तुमच्या नखाला धक्का लागूं नये म्हणून स्वतःचा गळा देईल त्याला. ( २ ) नवी व्याख्या—स्वतःचे नख वाचविण्यासाठीं तुमचा गळा कापेल त्याला.

**सौ. प्रभा हर्डीकर**, न्यू कॉलनी, औरंगाबाद.

**प्रश्न—'...वाळ सामंत ह्यांचा स्त्रिया आणि स्वैपाक हा लेख वाचून मला जरा आश्चर्य, थोडी चीड आणि राग आला...केवळ स्त्रियांची टिंगल म्हणूनच त्यानीं हा लेख लिहिलेला दिसतोय. विनोदात्मक म्हणावा तर त्यांत कुठेंच विनोद नाहीं...'**

**उत्तर**—एकूण स्त्रियांना विनोदबुद्धि थोडी कमी हेंच खरें !

**श्री. शं. वाळिंबे**—पुणें.

**प्रश्न—तिबेट हा चिनचा भाग आहे काय ?**

**उत्तर**—गोवा हा पोर्तुगालचा भाग आहे काय ?

**प्रश्न—माणसाच्या आयुष्यांत कशाविषयीं तरी—'हें घडेलच' असें निश्चित सांगता येईल काय ?**

**उत्तर**—त्याच्या मृत्यूविषयीं हें घडेलच असें सांगतां येईल.

**प्रश्न—तुमचा आवडता देव कोणता ?**

**उत्तर**—कृपण.

**प्रश्न—तुमचा आवडता ग्रंथ कोणता ?**

**उत्तर**—महाभारत.

**प्रश्न—तुमचा आवडता सण कोणता ?**

**उत्तर**—शिमगा.

**एल. जी. धोत्रे**—गिरगांव.

**प्रश्न—संत विनोबांचें पुष्कळसें बोलणें अस्पष्ट व घोटाळ्यांत पाडणारें असतें, असें कां ?**

**उत्तर**—ते गूढवादी संत आहेत.

**नलिनी नाईक**, हैद्राबाद.

**प्रश्न—स्त्री आणि पुरुष ह्यांत श्रेष्ठ कोण ? खरंखरं काय तें पुरावा देऊन सांगा.**

**उत्तर**—खरंखरं सांगतों. स्त्री आणि पुरुष ह्यांत पुरुषच सर्वतोपरी श्रेष्ठ आहे. जगांत आजवर होऊन गेलेले व आज विद्यमान असलेले थोर शास्त्रज्ञ, लेखक, कवि, धर्मसंस्थापक, डॉक्टर, राजकारणी, सेनानी, गायक, प्रवासी, चित्रकार, व्यायामपटु, वक्ते, संत, पुढारी, तत्वज्ञ, शासनकर्ते, इत्यादींची यादी काढून पहा. आपल्या असें ध्यानांत येईल कीं कुठल्याहि क्षेत्रांत फार मोठे कर्तृत्व दाखविणारे बहुतेक सगळे पुरुषच आहेत. पुरुष आणि स्त्री यांत निस्संशयपणें पुरुषच वरचढ आहे. आणि पुरुषानें आपल्यापेक्षां वरचढ असावें हेंच स्त्रियांना आवडतेंसुद्धां.

—०—



## माझी प्रतिभा

माझी प्रतिभा अहल्येपरी
शिळा होउनी अतां पसरली
तिला प्रभूचा पाय लागला,–
—प्रभूलाच पण ठेंच लागली !

— शंकर वि. वैद्य

## लेखकांस सूचना

१ 'दीपावली' सर्व प्रकारच्या साहित्याचा स्वीकार करतें.

२ लेखकांनीं मजकुराच्या सोबत आपला पूर्ण पत्ता आणि परतीसाठीं पुरेसें पोस्टेज पाठविलें पाहिजे. नाहींतर नापसंत लिखाण परत न पाठवितां निकालांत काढले जाईल.

३ साहित्याच्या स्वीकृतीबाबतचा निर्णय शक्य तितक्या लवकर कळविला जाईल.

४ स्वीकृत साहित्याचें संपादकीय धोरणानुसार संपादन करण्याचा हक्क संपादकांकडे राहील.

५ दीपावलींत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक मजकूराला मोबदला मिळेल.



अनुक्रमणिका











⊛ प्रा. श्री. के. क्षीरसागर ⊛ संमेलनाची ठरीव चाकोरी ⊛ साहित्यसंघाचें नवें मासिक ⊛ सरकार प्रणीत वाङ्मय पुरस्कार ⊛ चीन आणि तिबेट ⊛ सर जमशेटजी जिजीभॉय ⊛ शार्मण्यदेशीय चित्रकला ⊛ शिल्पमहर्षि फ्रॅंक लॉइड राईट, वगैरे.

## साहित्य

### प्रा. श्री. के. क्षीरसागर

मिरज येथें भरणाऱ्या ४१ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदीं सुप्रसिद्ध टीकाकार प्रा. श्री. के. क्षीरसागर यांची अध्यक्ष म्हणून निवड झाली याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय निवडणुकीसाठीं लायक कोण या बाबतचा एक निरर्थक वाद कांहीं दिवसांपूर्वी वर्तमानपत्रांतून गाजवला गेला. या वादाच्या दोन्ही बाजू मांडणाऱ्या प्रामाणिक प्रतिपादकांस प्रा. क्षीरसागर यांची निवड बव्हंशीं मान्य होण्यास हरकत नाहीं. 'प्रतिभा' पाक्षिकाच्या ऐन बहराच्या काळांत आपल्या मार्मिक आणि सडेतोड, चोखंदळ आणि निःपक्षपाती वाङ्मयसमीक्षेमुळें क्षीरसागरांचें नांव जाणत्यांच्या मुखीं झालें. माधव ज्यूलियनापासून रविंद्रनाथापर्यंत भिन्न भिन्न प्रवृत्तीच्या कवींच्या काव्याचा त्यांचा समतोल व्यासंग, त्यांच्या टीकालेखनास एक वेगळें वैशिष्ट्य निर्माण करता झाला. पांडित्याच्या जोडीला मर्मग्राही रसिकता हा क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्वाचा एक विशेष असल्यामुळें सामाजिक जीवनांतील विसंगति सूक्ष्मतेनें टिपणारी त्यांची सूक्ष्म नजर तेवढ्याच सूक्ष्मतेनें वाङ्मयीन सौंदर्यस्थलांचा दिलखुलास आस्वाद घेऊं शकते. समाजशास्त्राचा त्यांचा व्यासंग एकापरीनें त्यांच्या वाङ्मयीन भूमिकेस उपकारक ठरला. 'एकच प्याला' नाटकाच्या प्रखर आणि पांडित्यपूर्ण प्रस्तावनेमुळें प्रा. क्षीरसागर नव्या पिढीसमोर चमकले. आंग्ल टीकाशास्त्रांतील प्रमेयांचा अनुवाद करण्याच्या खटाटोपामुळें अनाकलनीय आणि दुर्बोध बनलेल्या मराठींतील नवशिक्या टीकाकारांना एकापरीनें हीं प्रस्तावना अजूनहि मार्गदर्शक ठरावी. प्रा. क्षीरसागरांनीं जें लिहिलं त्यामागें पाश्चात्य टीकाशास्त्राचें वाचन चांगलें पचविलें आहे अशी साक्ष पटते. इतकं असूनहि सभासंमेलनें आणि व्याख्यानें, भगतगणांकडून करवून घेतलेलीं योजनापूर्वक प्रशंसा आणि प्रसिद्धि या वाङ्मयीन राजकारणांपासून क्षीरसागर सदैव अलिप्त राहिले. आणि त्यामुळेंच क्षीरसागरांची अध्यक्षपदीं झालेली उचित निवड जितकी आश्चर्यकारक तितकीच वाङ्मयीन प्रगतीच्या दृष्टीनें उत्साहजनक आणि आशादायक ठरावी.

### संमेलनाची ठरीव चाकोरी

साहित्य संमेलनाची ठरीव चाकोरी बदलण्याची अवघड जबाबदारी आतां क्षीरसागरांवर आहे. या संदर्भात गेल्या आठदहा वर्षांतील साहित्य संमेलनांचें स्वरूप वार्षिक जत्रेपेक्षां फारसें वेगळें नाहीं. जत्रेला निदान भाविकजन मोठ्या कटाक्षानें उपस्थित राहातो पण या वाङ्मयीन उरुसाला साहित्यिक कटाक्षानें जायचें टाळतात. असाहित्यिक बाजारबुणग्यांचा नसता गोंधळ म्हणजे मराठी साहित्यसंमेलन असें नवे समीकरण रूढ करावयास हरकत नाहीं. या गोंधळांतील अवांतर घटना, सामुदायिक गटबाजी, स्थानिक हेवेदावे आणि मत्सर यांचे जाहीर प्रदर्शन यांनाच अधिक महत्त्व असते. अभ्यासहीन अशी चर्चा, कंत्राटी काव्यगायनें, रटाळ करमणुकीचे कार्यक्रम आणि बाटल्यास भोंगळ प्रदर्शन हें साहित्य संमेलनाचें कायमचें वैशिष्ट्य होऊं पहात आहे. दैनंदिन जीवन आर्थिक दुस्तरतेमुळें खडतर झालें आणि त्यामुळें आज जीवनांतील साहित्याची आणि साहित्यिकांची प्रतिष्ठा इतिहासजमा झाली. प्राध्यापक, कवि आणि साहित्यिक ही मंडळी आपल्या 'कर्तृत्वा'मुळें सामाजिक कुचेष्टेचा विषय बनली आहेत. या त्रयींभोंवतीं असणारें तेजःपुंज वलय आतां विलयाला गेलें असून 'भलते लोक' या धंद्यांत शिरले आणि त्यामुळें वाङ्मयसेवकाची ती पूर्वीची 'शान' गेली आतां. आणि त्यामुळें पूर्वीइतकें या वाङ्मयीन जत्रेबद्दल सामाजिक औत्सुक्य पार लोपलें असून किरकोळ उल्लेखापलिकडे नियतकालिकेंहि वाङ्मयीन घटनांची फारशी कौतुकपूर्ण नोंद करीनाशीं झालीं आहेत. साहित्यिकांचीं निरनिराळीं टोळकीं, त्यांच्यातील क्षुद्र मतभेद, परस्पर प्रशंसेचा कडेलोट, साहित्यिकांची घृणास्पद लाचारी आणि त्यांतून निर्माण झालेली गटबाजी, वाङ्मयांतील या सर्व तऱ्हेच्या अराजकाचा बीमोड करण्याची किंवा तशा तऱ्हेनें पावलें टाकण्याचें कार्य वास्तविक अशा प्रकारच्या साहित्यसंमेलनांतून घडावयास पाहिजे. मात्र प्रत्यक्षांत तसें न होतां उलटा अनुभव येतो आणि हें अराजक, ही बेदिली अधिकाधिक बेबंद होते. याला आणखी एक मोठें कारण म्हणजे कार्यशून्य महाराष्ट्र साहित्यपरिषद. क्षुद्र राजकारणापासून आणि अनिष्ट गटबाजी-

पासून अलिप्त असलेली संस्था महाराष्ट्रांत औषधाला मिळणं कठिण. शैक्षणिक संस्था, स्थानिक स्वराज्य संस्था आणि सहकारी संस्था यांच्या बाबत महाराष्ट्राची प्रगति शून्य आहे. याचें कारण संस्थांचे पदाधिकारी सदैव या भलत्या राजकारणांत गुंतलेले असतात. साहित्यपरिषद याला अपवाद नसल्यामुळें वाङ्मयेतिहासाच्या योजनेचा हां हां म्हणतां बोजबारा उडाला.

हें बेदिली नष्टं करण्याचें कार्य क्षीरसागर ।केतपत यशस्वी करतील ही शंकाच आहे. पण साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष हा वर्षभर परिषदेचा अध्यक्ष असतो आणि आतांपर्यंतच्या अनुभवावरून या बाबतींत पूर्वीच्या अध्यक्षांनीं कांहीं विशेष कार्य केल्याचा दाखला नाहीं. प्रा. क्षीरसागरांनीं याबाबतींत जोराची हालचाल करून परिषदेला कार्यप्रवण करावी हीच अपेक्षा.

## साहित्यसंघाचे नवे मासिक—

मुंबई मराठी साहित्यसंघातर्फें एक नवें मराठी मासिक निघत आहे असें कळते. गेलीं कांहीं वर्षें मुंबई मराठी साहित्य संघ आपल्या वाङ्मयीन कामगिरीपेक्षां नाट्यविषयक कामगिरीमुळेंच अधिक नामवंत झाला. पण अलीकडे साहित्यसंघाच्या नव्या तरुण कार्यकर्त्यांना कांहीं वाङ्मयीन कार्य करण्याची आणि करून दाखविण्याची खुमखुमी आली आहे, हें रास्त आहे. या संदर्भात संघानें गेल्या वर्षी ' साहित्य १९५६ ' नांवाची एका वर्षातील वाङ्मयसमालोचनात्मक ६६ पृष्ठांची पुस्तिका दोन रुपयांत दिली. यंदा ' साहित्य १९५७ ' ही ७८ पानांची पुस्तिका ३ रुपयांत दिली आहे. वर्षातील सर्व मराठी साहित्याचा साठसत्तर पृष्ठांत आढावा घेण्याची ही धाडसी कल्पना व्यावहारिक दृष्ट्या ग्राहकांना महाग पडली तरी अभिनंदनीय. या पुस्तिकांचा दुसरा विशेष म्हणजे त्यांतील सर्व समीक्षक लेखक नवशिके असून त्यांचा अभिनिवेश जाणत्यालाहि लाजवील असा आहे.

या वार्षिकाच्या मागोमाग संघातर्फें निवळ पुस्तक परिक्षणें देणारें मासिक निघणार आहे, ही तेवढीच धाडसाची गोष्ट. कारण आजकाल मराठी मासिकांत पुस्तक परीक्षण हें शोभेलाच असतें. या समीक्षात्मक अलंकारांचा तिटकारा आहेसें दाखवून कांहीं धूर्त संपादक त्या बाजूला फिरकतच नाहींत. वास्तविक पाहातां विविधज्ञान विस्तार, रत्नाकर इत्यादि मराठींतील अग्रेसर मासिकांत पुस्तक-परीक्षणांना महत्त्वाचें स्थान होतें. या मार्मिक आणि विवेचक परीक्षणांमुळें मराठी साहित्य-शास्त्र बऱ्याच अंशीं प्रगत झालें. त्या काळांत लेखक जितके सामर्थ्यवान तितकेच परीक्षकहि बलदंड होते. आज मराठींत साहित्यिकांची कातडी फार नरम झाली आहे. सत्यान्वेषी टीकेंतील अपरिहार्य मतप्रदर्शन त्यांना कांट्या-प्रमाणें सलतें. परीक्षकाची प्रामाणिक धिटाई त्यांच्या प्रकृतीला मानवत नाहीं.

यामुळें निर्भीड परीक्षणें लिहिणारे धाडसी परीक्षक आणि असलीं परीक्षणें धिटाईनें छापणारे निधड्या छातीचे संपादक हल्लीं उंबराच्या फुलाप्रमाणें दुर्मिळ झाले आहेत. अशा अवघड कालांत परीक्षणासाठींच जन्माला येणारें मासिक ही घटना कौतुकास्पद आहे. अर्थात् आप्तजनांना आणि स्वकीयांना न दुखावतां तारेवरची कसरत नव्या दमाचे टीकाकार कितपत यशस्वी करतात हें आतां पाहायचें.

## सरकारप्रणीत वाङ्मय पुरस्कार

गेल्या चार पांच वर्षांत मुंबई सरकार नाट्य, कला आणि साहित्य यांच्या प्रगतीबाबत विशेष आस्था दाखवूं लागलें आहे ही अभिनंदनाची गोष्ट. समाजकल्याण मंत्री श्री. नाशिकराव तिरपुडे यांचा उत्साह हा याबाबतींत विशेष उल्लेखनीय आहे. यंदाच्या वर्षी शिक्षणखात्यातर्फें दरसालाप्रमाणें मराठी भाषेंतील उत्कृष्ट पुस्तकांना पारि-तोषिकें जाहीर करण्यांत आली. गेल्या दोन वर्षांची यादी पाहातां तेच तेच साहित्यिक लागोपाठ बक्षिसपात्र ठरत आहेत असें दिसतें. याचा अर्थ असा कीं मराठींत नव्या दमाचे साहित्यिक अजून बक्षिस पात्र असें लिखाण करीत नाहींत अगर करीत असल्यास कोणत्या ना कोणत्या कारणांमुळें त्यांना बक्षिसें मिळत नाहींत. याशिवाय आणखी एक दोन प्रमाद यंदा घडले आहेत. एक म्हणजे पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीस पारितोषिक मिळणें. या न्यायानें देवल, खाडिलकर आणि गडकरी यांचीं नाटकें बक्षिसपात्र ठरावयास हरकत नाहीं. दुसरा भयंकर प्रमाद म्हणजे भाषांतरित नाटकाला पारितोषिक. भाषांतरित पुस्तकाला पारितोषिक देण्याबाबत आमचें कांहींच म्हणणें नाहीं. उलट उत्तम भाषांतराला जरुर बक्षिस द्यावें. पण मग हा न्याय सर्व वाङ्मयप्रकारां-नाहि लावावा. उत्तम कथा, उत्तम कादंबरी भाषांतरित असली तर तीहि बक्षिसपात्र ठरेल कीं नाहीं याचाहि खुलासा सरकारनें करावा. अर्थात या सर्व प्रमादांचा दोष सरकार अगर मंत्रि यांच्याकडे नसून सरकारनें नेमलेल्या साहित्यिकांच्या ' बक्षिस कमेटी ' कडे जातो. या कमेटीचा कारभार आणि पद्धति कांहींशी दोषास्पद आणि शंका-स्पद असावी, आणि आपले कार्य ही मंडळी फारशा प्रामाणिकपणें करीत नसावी असा अंदाज आहे. हे दोष घालविण्यासाठीं सर-कारनें समितीच्या सदस्यांचीं नांवें निकाल जाहीर झाल्यावर जाहीर करावींत. याशिवाय बक्षिसपात्र पुस्तकांसाठीं त्यांचे निकष कोणते, त्यांचे नियम कोणते, या करितां प्रकाशकांनीं आपणहून पुस्तकें पाठवली पाहिजेत कीं सरकार खुद्द आपणहूनच त्या वर्षांत प्रकाशित झालेल्या पुस्तकांचा त्या समितीतर्फें परामर्श घेणार, शिवाय अशा निकालाविरुद्ध कांहीं शंका असल्यास अपील करण्यास कांहीं जागा आहे काय; इत्यादि सर्व बाबींचा खुलासा शिक्षण खात्यानें करावा. याशिवाय किती दिवसांच्या अवधींत समितीनें हें कार्य पार पाडलें याचाहि तपशील सरकारनें द्यावा. याशिवाय लेखकांच्या बरोबर ज्या प्रकाश-कांच्या सर्वांत अधिक पुस्तकांना पारितोषिकें मिळालीं अशा प्रकाशकालाहि सरकारनें बक्षिस द्यावें. शिवाय जीं पुस्तकें बक्षिसाई ठरतील त्याच्या किमान हजार प्रती सरकारनें घेतल्यास उत्तम पुस्तकें छापण्यास प्रकाशकांना कांही हुरूप येईल. अर्थात् या हजार प्रतींचें काय करायचें असा प्रश्न सरकारला आज पडण्याचें कारण नाहीं. सरकारचीं जिल्हा आणि तालुकानिहाय माहिती केंद्रे, विकास गटांतील वाचनालयें, ग्रामपंचायती, लोकलबोर्ड आणि नगरपालिका यांची वाचनालयें यासाठीं सरकार दरवर्षी हजारों रुपये भरताड पुस्तका-साठीं खर्च करतें. या सर्व विकास अधिका-ऱ्यांना आणि सर्व माहिती केंद्राच्या प्रमुखांना हीं पुस्तकें सरकारनें पुरवावींत अगर विकत घेण्याची सूचना करावी.

— पिनाकि

## राजकारण

### चीन आणि तिबेट

हिमालयाच्या कुशींत वसलेल्या तिबेटचा आध्यात्मिक राजप्रमुख दलाई लामा याचें नाट्यपूर्ण पलायन या घटनामुळें आंतरराष्ट्रीय राजकारणांत खळबळ उडाली आहे. वास्तविक पहातां परकीय आक्रमणें तिबेटला कांहीं नवीन नाहींत. मोंगल आणि मांचू सम्राटांचा तिबेटवर नेहमींच डोळा होता. आज चीनची अधिकार सूत्रें कम्युनिस्टाकडे असली तरी त्यांनीं चीनची ही जुनी परंपरा कायम ठेवली आहे. दलाई लामाचें हें तिसरें जाहीर पलायन. पहिलें चीनमध्यें, दुसरें भारतांत आणि तिसरेंहि भारतांतच.

२३ मे १९५१ रोजीं चीन आणि तिबेट यांच्यांत एक करार झाला. या करारान्वयें तिबेटची प्रादेशिक स्वायत्तता लाल चीननें मान्य केली होती. तसेंच तिबेटच्या प्रादेशिक सरकारला स्वयंप्रेरणेनें आपली सुधारणा घडवून आणण्याची मुभा दिली होती. असें असतां गेल्या चार महिन्यांत तिबेटच्या आर्थिक विकासाचें एक सत्र चीननें सुरू केलें. त्यांच्या सोन्याच्या खाणींची सुधारणा रस्ते बांधणीं, शालागृहांच्या इमारती, साक्षरता प्रसार या वेगळ्या वेगळ्या सुधारणांचें एक नवें पर्व सुरू झालें. यासाठीं चिनी तंत्रज्ञ, लष्करी आणि इतर लोकांची तिबेटांत आवक वाढली. आम्ही हें सारें मागासलेल्या जनतेच्या कल्याणासाठीं करीत आहोंत असा लालचीनचा दावा होता. त्याकरितां त्यांनीं मठांचा विध्वंस केला, लामांना निराधार केलें. चीननें आपल्या कृत्यावर हा आमचा अंतर्गत प्रश्न आहे असें म्हणून कितीहि पांघरूण घातलें तरी तिबेटमधील अन्यायाचें समर्थन होत नाहीं. शिवाय दलाई लामांच्या नुकत्याच जाहीर झालेल्या निवेदनामुळें चीनचा हा कांगावा उघडाच पडला आहे. या प्रकरणीं भारत सरकारची भूमिका आज तरी प्रशंसनीय आहे. लालचीनला युनोंत प्रवेश द्या असा आग्रह धरणाऱ्या भारत सरकारनें दलाई लामांना आश्रय दिला इतकेंच नव्हे, तर तिबेटचे लोक चिनी नसून तिबेटीच आहेत हें पं. नेहरूंचें विधान या प्रकरणीं भारत सरकार खंबीर भूमिका घेईल अशी आशा देणारें आहे. नेहरूंच्या 'पंचशील' धोरणाची आतां कसोटी लागण्याचा समय प्राप्त झाला आहे हें निश्चित.

—विष्णुशर्मा

## सत्यं शिवं सुंदरम्

### सर जमशेटजी जिजीभॉय

मुंबईच्या चित्रकलेच्या इतिहासांत जे. जे. स्कूल ऑफ आर्टची थोरवी कांहीं वेगळीच. अनेक चित्रसंस्थांची ती गंगोत्री आणि अनेक चित्रकारांची ती कर्मभूमी आहे. पण मुंबईला ही देणगी एका गरीब विणकऱ्याच्या मुलानें दिली हें विसरतां कामां नये. १७८३ मध्यें मुंबईच्या एका दरिद्री मोहल्ल्यांत जमशेटजीचा जन्म झाला. पण कर्तृत्व आणि धाडस यांना दारिद्र्याची सीमारेषा सहज ओलांडतां येते. जमशेटजीनें नाविक व्यापारांत पैसा आणि नांवलौकिक मिळवला आणि सातांसमुद्रांना गवसणी घातली. पण या धनपतीनें आपल्या संपत्तीचा व्यय मुंबईचें वैभव वाढविण्यासाठींच केला ही विशेष गोष्ट होय. १८५३ मध्यें त्यांनीं मुंबई सरकारला आर्टस्कूलच्या स्थापनेसाठीं १ लाख रुपये बहाल केले. २ मार्च १८५७ रोजीं आर्टस्कूलची स्थापना झाली आणि मुंबईचें कलाविश्व उजळलें.

मुंबई शहरांतील पहिलें सिव्हिल हॉस्पीटल सर जमशेटजीच्याच १॥ लक्ष रुपयांच्या देणगींतून उभारलें गेलें. दातृत्वाचा उच्चांक गाठणारा हा थोर माणूस १८५९ च्या एप्रिल महिन्यांत निधन पावला. त्याप्रसंगीं मुंबई टाईम्सनें लिहिलें—

"—He has left none equal to himself behind and India may put on mournig for the greatest of her sons. But let none be discouraged from following him with however unequal steps."

### शार्मण्यदेशीय चित्रकला

गेल्या महायुद्धानें जर्मनराष्ट्र पराभवानें खचलें. पण गेल्या दहावर्षांतील जर्मनीची सर्वांगीण प्रगति आश्चर्यजनक आहे. आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक विभागांतील जर्मन घोडदौड ज्या वेगानें चाललेली आहे त्याचा अर्थच असा कीं आणखी कांहीं वर्षांत जर्मनी आपलें पूर्वीचें स्थान मिळविणार. याची ओझरती चुणुक गेल्या महिन्यांत जहांगीर आर्ट गॅलरींत भरलेल्या 'जर्मन आर्ट ऑफ टु डे' या चित्रकला प्रदर्शनावरून आली. युद्धपूर्वकाळांत नाझी अंमलांत जर्मन चित्रकारांची फार घुसमट झाली. या बंधनांतून सुटलेल्या प्रतिभावंतांची कामगिरी या प्रदर्शनांत पाहावयास मिळाली. या चित्रकला प्रदर्शनाचा विशेष हा कीं अभिव्यक्तीच्या बाबतींत जर्मन कलाकार अगदीं निर्भयपणें वेगवेगळे प्रयोग करीत आहेत. अर्थात् आशयाच्या प्रकटीकरणांत कांहीं कलाकार वास्तवापेक्षां गूढ तर कांहीं वास्तवापेक्षां अधिक सूचक आणि सोपे वाटले. या सर्व चित्रांचा दर्जा वरच्या पातळीचा होता, तरी जर्मन कुंचल्याची पूर्वीची धिटाई आणि प्रसन्न मोकळेपणा अजून आढळत नाहीं. युद्धपूर्वकाळांतील राजकीय बंधनाचा हा अपरिहार्य अवशेष असावा.

त्यांतल्या त्यांत फ्रिटस् विंटरचें कॉम्पोझिशन रंगसंगतीचा उत्कृष्ट मिलाफ यादृष्टीनें आदर्श होतें. कार्ल हार्टंग हा 'चारकोल'चा जादूगार वाटला. ऑटो एग्लॅनची निसर्गदृश्यें खरोखरच परिणामकारक आणि प्रशंसनीय वाटली. वॉटरकलरच्या विभागांत साधेपणा पण कुंचल्याची करामत मुलायम वाटली. कांहीं चित्रकारांचे कसब या विभागांत अर्थात् प्राथमिक दर्जाचें वाटलें. आणि त्यामुळें विली बॉमिस्तर किंवा थिओडोर वर्नर सारख्या असामान्य कलाकारांची अनुपस्थिति फार जाणवली. तरीपण युद्धोत्तर जर्मन चित्रकलेच्या नव्या ढंगाची कांहींशी स्थूल कल्पना या प्रदर्शनानें दिली यांत वादच नाहीं.

### शिल्पमहर्षि फ्रँक लॉईड राईट

जागतिककीर्तीचा शिल्पी फ्रॅन्क लॉईड राईट हा मृत्यूसमयीं ८९ वर्षांचा होता हें कुणाला सांगूनहि खरें वाटणार नाहीं. ग्रोपीयस आणि ली कॉरबुसीयर या नामवंत शिल्पशास्त्रज्ञांप्रमाणें फ्रॅन्क लॉईड हा आधुनिक शिल्पशास्त्राचा निर्माता. घर बांधणीच्या शास्त्रांत त्यानें आमूलाग्र क्रांति केली. सर्वसामान्य लोकांना नवें लवकर पचवितां येत नाहीं, आणि त्यामुळें राईट सारख्या कलावंताला आपल्या कल्पना मूर्त स्वरूपांत आणावयास फारच यातायात पडली. त्याच्या एवढा प्रतिभाशाली शिल्पी अर्वाचीन काळांत

[ पृष्ठ ५४ वर चालू ]




‘ शीतल सुखदु:खें ’

—बाळ सामंत

‘ चंदेरी दुनिया ’

— मधुकर कर्णिक

## शीतल सुखदु:खें

### चांदण्यांतील सुगंध

आधुनिक मराठी लघुकथेच्या गेल्या दहाबारा वर्षांच्या कालखंडांत मराठी कथेनें बहुविध रूपें धारण केली १९४६ पूर्वीची मराठी कथा बव्हशीं घटनाप्रधान होती तर पु. भा. भावे, अरविंद गोखले आदि नव्या दमाच्या प्रथम श्रेणीच्या कथाकारांनीं मराठी कथेला एक वेगळाच आकार आणला आणि नवें सामर्थ्य प्राप्त करून दिले. घटनाप्रनाध मराठी कथा अधिकाधिक अंतर्मुख होऊं लागली, मानवी मनोव्यापाराचें सूक्ष्म चित्रण करण्यांत रंगू लागली. या कथाकारांचा मागोवा घेत जे तरुण कथाकार गेल्या पांच सहा वर्षांत उदयाला आले त्यांत अच्युत बर्वे यांचें स्थान बऱ्याच वरच्या दर्जाचें आहे. चंदनाचा उंबरठा, झोका आणि त्यानंतरचा आतांचा ‘ चांदण्यांतील सुगंध ’ या कथासंग्रहानें बर्व्यांनीं आपलें स्वतंत्र स्थान निश्चित केलें आहे. बर्व्यांचे सर्वांत मोठें वैशिष्ट्य म्हणजे त्याची धांवती प्रसन्न सुललित अशी लेखन शैली. या तरल अशा निवेदनशैलीमुळें बर्व्यांच्या कथेला आकर्षक अशी वाचनीयता आली आहे. त्यांचें भावदर्शन अत्यंत तलम आणि हळूवार आहे. त्यांत जीवनाबद्दल कटुता अथवा घृणा नाहीं. उलट जीवनाबद्दलची उमेद आणि आशा निरोगीप्रवृत्तीची आहे. चांदण्यांतील सुगंध या कथासंग्रहाचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांतील विषयवैचित्र्य. बर्व्यांची निरीक्षणशक्ति सूक्ष्म आणि प्रतिभा अत्यंत संवेदनाक्षम आहे. नवकथाकाराच्या आजच्या जमान्यांत अशा प्रकारचें स्निग्ध, हळूवार आणि निरागस जीवनदर्शन विरळाच. सोन्याचा पिंपळ, कल्पद्रुम माझ्या अंगणीं, गट्टी, कवडसा इत्यादि कथांत बर्व्यांच्या भावी कथा लेखनाच्या प्रगतीचीं पदचिन्हें स्पष्ट दिसतात. भलतें गूढगुंजन आणि निरर्थक सत्यदर्शन याचा हव्यास बर्व्यांना नाहीं आणि त्यांच्या कलात्मक ऋजुतेला मानवण्याजोगा नाहीं. या संग्रहांतील उपरोक्त कथांतील भरीव आणि समृद्ध आशयानें त्यांच्या लोभसवाण्या शैलीवरहि मात केली हें निश्चित. आणि यांतच त्यांच्या कथेचें खरें सामर्थ्य. दानव, पांखर यासारख्या कथांत चुरचुरीतपणा असला किंवा आंतरिक भावदर्शनाचा आभास असला तरी त्यांतील व्यक्तिदर्शन फसवें आणि नटवें वाटतें. या संग्रहांतील हे अपवाद सोडले तर चांदण्याचा सुगंध या सुरेख कथासंग्रहानें मराठींत एका उत्तम कथासंग्रहाची निश्चित भर घातली आहे.

•

## चंदेरी दुनिया

### सूर्याचं चांदणं

नवकथेच्या जमान्यांत गोष्टी वाचण्याची आवड असलेल्या वाचकांना ‘ सूर्याचें चांदणें ’ आवडेल. यांत खून मारामाऱ्या, उदात्त प्रेम, पाटलाचा पोर, सिनेमानटी आणि दिग्दर्शक हा भडक मालमसाला भरपूर प्रमाणांत आहे. पाटलांच्या ‘ एरिना ’ या दुय्यम दर्जाच्या कथेला एकदां पारितोषिक मिळालें होतें. पण त्यानंतर पाटलांनीं फारशी वरची पायरी गांठलेली दिसत नाहीं. या कथासंग्रहांतील कांहीं कथांवर चित्रपट निघाले आहेत. व ते त्या स्वरूपाचें भडक, नाटकी आणि गडद वातावरण या कथांत प्रामुख्यानें आहे. त्यामुळें चटकदारपणा असला तरी आगगाडीच्या प्रवांसांत वेळ घालवायला वाचण्यासाठींच. एवढेंच व्यावहारिक मूल्य या कथासंग्रहाला आहे. पाटलांकडे कथा रंगविण्याची शैली आहे. पण त्यापलीकडे जाऊन वाचकांच काळीज हलवील, क्षणभर त्यांना अस्वस्थ करील असें भावदर्शन घडविण्याची ताकद नाहीं.

---

## साहित्य-स्वीकार

(१) **संशोधकाचें बालपण** ले. प्रा. ना. वा. कोगेकर प्र. बा. ल. पाठक प्रकाशन मुंबई नं. २.

(२) **वैशाख** (कादंबरी) ले. श्री. माधव कानिटकर प्र. कुळकर्णी ग्रंथागार—पुणें २.

(३) **चंदनाची वीणा** ( कथासंग्रह ) ले. श्री. माधव कानिटकर प्र. कुळकर्णी ग्रंथागार—पुणें २.

(४) **वळीव** ( कथासंग्रह ) ले. श्री. शंकर पाटील प्र. मौज प्रकाशन—मुंबई ४.

(५) **मर्ढेकरांची कविता** कवि कै. बा. सि. मर्ढेकर प्र. मौज प्रकाशन–मुंबई ४.

(६) **मेघदूतावर नवा प्रकाश** ले. बा. कृ. परांजपे प्र. य. गो. जोशी प्रकाशन–पुणें २.

(७) **हद्दपार** ( कादंबरी ) ले. श्री. ना. पेंडसे प्र. मौज प्रकाशन गृह मुंबई ४.

(८) **शितू** ( कादंबरी ) ले. गो. नी. दांडेकर प्र. मौज प्रकाशन–मुंबई ४.

(९) **पडघवली** (कादंबरी) ले. गो. नी. दांडेकर प्र. मौज प्रकाशन–मुंबई ४.

(१०) **सुलभा** (कथासंग्रह) ले. श्री. ज. जोशी प्र. मौज प्रकाशन–मुंबई ४.

(११) **पर्वकाल ये नवा** ले. कवि यशवंत प्र. सौ. नीराबाई पेंढारकर १९६।३४ सदाशिव पुणें २.

---

[ पान ५३ वरून ]

झालाच नाहीं. त्यामुळें १९२६ सालच्या टोकीयोच्या प्रचंड भूकंपांत सर्व इमारती नष्ट झाल्या पण राईटनें बांधलेलें भव्य हॉटेल तसेच शाबूत राहिलें. कारण या हॉलची इमारत बांधतांना या संकटांचा विचार करूनच त्यानें आपली प्रतिभा पणाला लावली होती. त्याची प्रत्येक नवी इमारत म्हणजे त्याचें त्यालाच आव्हान होतें. अजंठा आणि सांची येथील वास्तुशिल्पांचे भ्रष्ट नमूने ज्या देशांतील प्रदर्शनाभोंवतीं उभारले जातात त्या देशांतील जनतेला अजून आधुनिक शिल्पशास्त्र म्हणजे काय तें शिकायचें आहे. तें उपयुक्त हवेंच पण त्याबरोबर सौंदर्यपूर्णहि हवें आणि हे यथार्थतेनें शिकविणारा थोर शिल्पशास्त्रज्ञ आज नाहींसा झाला ही कलाविश्वांतील मोठीच पोकळी.

—**नटराज**



(पान ३९ वरून पुढें चालू)

ताराच्या डोळ्यांतून अश्रूंच्या सरी वहात होत्या आणि तारा म्हणत होती, " तुमच्याशिवाय मला दुसरं कोणी नाहींच मुळीं. "

" कां बरं ? बाप आहे. आई आहे. "

" ती त्यांच्या घरीं ! मी माझ्या घरी ! या घरांतला परमेश्वर तुम्ही आहांत. तुमची बायको ती माझी बहीण ! तुम्हांला वाटत असेल कीं मी तिची सवत आहे. पण तुमच्या पायाची शपथ, ती माझी बहिण आहे. मी तिची सेवा करीन. तुमची सेवा करीन. दासी म्हणून मी इथें राहीन. पण मला या घराबाहेर काढूं नका. आपल्यापासून दूर करूं नका. माझी बेअब्रू करूं नका. लग्नानंतर माहेरहून निघाले, तेव्हां आईनं मला एका बाजूला नेऊन सांगितलं, " ताटभर अन्न माणसाच्या पोटांत रहातं. माणूस पचवून टाकतो. तशा सासरच्या सगळ्या गोष्टी मनांत ठेव. ओकूं नकोस. दिसूं देऊं नकोस. या घरांत तुम्ही केलेला सगळा अपमान मी गिळून टाकीन. पण मला या घराच्या बाहेर काढूं नका. माझं एवढं ऐका. "

" माझं ऐकणार नाहींस ? " महेश्वरपंत एकदम स्वर बदलून आणि पलंगावरून उठून म्हणाले, " माझं ऐकशील कीं नाहीं तूं ? "

" ऐकेन. "

" तेवढं सांगूं नका. "

" मी हेंच सांगणार. "

" नको. नको हो. मी या खोलींत, कोंपऱ्यांत कुठेंही......

" महेश्वरपंत एकदम तरातरा चालत स्वयंपाक घरांत गेले आणि घासलेटची बाटली घेऊन आले. एका हातांत ती बाटली, आणि दुसऱ्या हातांत काड्यांची पेटी ! ती बाटली त्यांनीं आपल्या अंगावर ओतून घेतली.

" अहो हें काय ? हें काय ? " त्यांचा हात धरून तारा ओरडली.

" बाजूला हो. हें काय तें सांगतों. दे रॉकेल आणि ही काडी. तूं जर या घरांतून गेली नाहींस तर ही काडी ओढून मी स्वतःला जाळून घेईन. "

" नको नको. " घाबरेपणानें ओरडत तारा म्हणाली " असं करूं नका. असं करूं नका. मी जाते. "

" मग जा तर "

" जाते. " तारा मागें मागें होत होती आणि महेश्वरपंत काडी ओढण्याच्या पवित्र्यांत तिच्या पुढें पुढें येत होते. "

" जा. तूं आत्तां जा—"

" आत्तां जाऊं ? "

" हो. याक्षणीं ! या मिनिटाला याचवेळीं तूं घराबाहेर हो. नाहींतर ही काडी..."

" ती काडी तुम्ही मला लावा. मला लावा ती काडी म्हणजे एकदां संपू दे तरी सगळं. "

" तुला काडी लावण्याइतका मीं मूर्ख नाहीं. मी मला काडी लावून घेईन. आणि तूं लावलीस असा डंका पिटेन. त्यापेक्षां तूं जा. नाहीं तर......नाहीं तर......महेश्वरपंतानीं खरोखरींच काडी पेटवली.

तारा एकदम किंचाळली. झडप घालून तिनें महेश्वरपंतांच्या हातांतली काडी विझवली. आणि ती आपलें कपडे गोळा करूं लागली. महेश्वरपंतानी दुसरी काडी पेटवली आणि तें तिच्या मागें लागलें, " जातेंस कीं नाहीं ? जातेंस कीं नाहीं ? "

" जाते जाते. " तारा " जाते जाते. " म्हणत होती आणि कपडे गोळा करत होती. एका पिशवींत तिनें ते कपडे कोंबले. आणि " जाते जाते. " म्हणत त्या अपरात्रीं ती घराबाहेर पडली. रस्त्यावर आली तरी ती किती तरी वेळ " जाते जातेंच " म्हणत होती.

* * *

विजापूर सोडून तारा पुण्याला आली. तिनें आपलें तें गांवच सोडलें असें नाहीं तर आपलीं सारीं माणसेंहि सोडलीं. आपल्या माहेरच्या माणसांचा संबंध तिनें तोडला असें नव्हे. पण ती कोणाच्या आश्रयाला गेली नाहीं. एका शाळेंत तिनें नोकरी धरली आणि ती एकटी जगूं लागली. ताराचा सगळा वेळ या शाळेंतच जाऊं लागला. घरचें काम आणि शाळेचें काम संभाळून तारा अगदीं शांतपणें जगूं लागली. इतक्या शांतपणें कीं जणुं एखादी योगिनीच ! आपल्या घराचा उंबरा ओलांडल्यावर तारानें जी पांढरी साडी आणि पांढरें पोलकें परीधान केलें तें कायमचेंच ! त्यानंतर ती कधींही रंगीत साडी नेसली नाहीं. तिनें कधींहि फुलें माळलीं नाहींत. कधीं अत्तर लावलें नाहीं. अंगावर दागिने घातले नाहींत. गळ्यांत मंगळसूत्र आणि हातांत कांचेच्या पांच पांच बांगड्या भरल्या. तारा अगदीं पहाटें उठायची आणि तास तास देवासमोर बसायची. तिनें कधीं कोणाशीं मैत्री केली नाहीं. कोणाशीं भांडण केलें नाहीं.

कारण तारा ज्या जगांत वावरत होती त्या जगांत ती जगत नव्हती. जगापासून एक वेगळा कोपरा तोडून घेऊन जणुं ती रहात होती. वरून शांतपणें जीवन व्यतीत करणारी ही मुलगी आंतून अगदीं पेटलेली होती. महेश्वरपंतांच्यावरची तिची निष्ठा तिळमात्र कमी झाली नव्हती. लग्न लागल्या दिवसापासून महेश्वरपंतांचा तिनें जो ध्यास घेतला होता तो विलक्षण होता. ज्या महेश्वरपंतानें तिला काडीमात्र सुख दिलें नव्हतं, ज्या महेश्वरपंतानें तिला संसारांतून उठवलें होते, देशोधडीं लावलें होते, त्या महेश्वरपंतावर तिचें अतोनात मन जडलें होतें. लग्नांतले विधी, लग्नांतले मंत्र, तीं सात पावलें या मुलीवर एवढा परिणाम करून गेलीं कीं दिवसरात्र सारखें तिला तेंच दिसे. महेश्वरपंतांचें रूप, महेश्वरपंतांच्या बरोबर केलेला एक दिवसाचा संसार या गोष्टी म्हणजे तिच्या जीवाभावाच्या आठवणी होत्या. त्या आठवणींवर ती जगत होती. त्या आठवणीवर तिची श्रद्धा होती. निष्ठा होती. तिची आई, तिचे वडील, अधून मधून तिची खबर घ्यायला यायचे. " माहेरीं चल " म्हणायचे. पण तारा म्हणे, " तें तुमचं घर. हें माझं घर. मी माझ्याच घरीं असावं हेंच उत्तम आहे. "

एकदां तिची आई म्हणाली, " किती वेडी आहेस तूं तारा ! असा जीव जाळून काय होणार आहे ? मी जुन्या मताची बाई खरी. पण मला सुद्धां वाटतं कीं यांत कांहीं अर्थ नाहीं. घटस्फोट घे आणि..."

" आई ! " तारा करडेपणानें म्हणाली, " एकदां म्हणालीस तें म्हणालीस. पण पुन्हां हा उच्चार माझ्यासमोर करूं नकोस. "

" कां ? कां ग ? " तिच्या आईलाहि तिच्या या कर्मठपणाचा राग आला. " कां नाहीं म्हणायचं ? त्यानं काय सुख दिलंय तुला ? "

" दिलंय. " तारा भारावून, एखाद्या स्वप्नांत शिरावें तशी म्हणाली, " दिलंय. त्यांनीं मला सुख दिलंय. एक दिवस आम्ही दोघांनी संसार केलाय. मी त्यांना वाढलं आणि ते जेवले. नाहीं–नाहीं तें तुला कळायचं नाहीं आई. "

" मला नाहीं कळायचं ? "

" कळत असलं तर पहा. " तारा मंद स्वरांत कुजबुजली, " कळत असलं तर कळवून दे. पण मला यापेक्षां कांहीं जास्त सांगतां येत नाहीं. एवढंच सांगतें, कीं त्यांनीं मला सुख दिलं आहे. त्यांनी आणि मी संसार केला आहे. " त्यांचं रूप, त्यांचा स्पर्श, ती सुखानें भारावलेली रात्र......ताराला तें दिसूं लागलें.

आणि तारा पत्र लिहूं लागली. तारा मुळीं महेश्वरपंतांना रोजच एक पत्र लिही. त्याचें उत्तर येवो अगर न येवो, उत्तर येतच नव्हतें. पण ती नित्यनेमानें पत्र लिहायची. पत्र लिहायचें आणि टपालांत टाकायचें. रोज टपालाची वाट पहायची. निराश न होतां दोन्हीं वेळां वाट पहायची. आणि पुन्हां लिहायचें. पुन्हां पत्र टपालांत टाकायचें. परमेश्वराजवळ रोज हें एकच मागणें मागायचें. ताराला कपडा नको होता. दागिना नको होता. पैसा नको होता. चैन नको होती. आराम नको होता. लौकिक, कीर्ति, यांपैकीं कशाचीहि तिला अभिलाषा नव्हती. पोटासाठीं ती नोकरी करीत होती पण तिचें ध्येय होतें महेश्वरपंत ! महेश्वरपंतांचें प्रेम ! त्यासाठीं ती नोकरी संभाळून वडाचे पार झिजवी. उंबराला पाणी घाली. महादेवाला बेलाचा लक्ष वाही. बाळकृष्णाला प्राजक्ताची लाखोली वाही. गणपतीला दुर्वांचे लक्ष घाली. तारानें अळणी चतुर्थ्या धरल्या. सोळा सोमवारांचें खडतर व्रत केलें. हरतालिका पूजली आणि केवळ रुईचें पान चाटून उपास केला. तीन दिवसांचें निर्जळ उपोषण करून वटपौर्णिमा पूजली. आणि हीं सारीं व्रतवैकल्यें चालू असतांनाच महेश्वरपंतांना रोज एक पत्र लिहिण्याचेंहि व्रत मनोभावें पाळलें. देवांबरोबर तारानें त्यांच्याहि छायाचित्राला फुलें वहावीत. निरांजन ओवाळावें. तारानें आपल्या मनाचे सगळे दरवाजे अगदीं बंद करून घेतले होते. एकच दरवाजा उघडा होता. आणि त्या दाराच्या चौकटींत महेश्वरपंत उभे होते !

पण महेश्वरपंतांनी कधीं तिच्या पत्रांना उत्तर पाठवलें नाहीं. एका अक्षरानें तिची विचारपूस केली नाहीं. एकदांहि तिची कधीं काळजी केली नाहीं. तारा नांवाची आपली बायको याच जगांत वास्तव्य करून आहे आणि आपल्यासाठीं झुरत आहे याची त्या महेश्वर सोमनाथ दातेनें कधींहि दखल घेतली नाहीं.

पण तारानें मात्र पत्रांतून त्याची रोज प्रार्थना करावी. " मला आपण कधीं नेणार अहांत ? आपल्याशिवाय माझं जिणं व्यर्थ आहे. आपल्याशिवाय मी जगूं शकत नाहीं. आपल्याइतकं प्रिय या जगांत मला कांहींहि नाहीं. आपण मला कांहींहि देऊं नये. फक्त आपली सेवा माझ्या हातून घडावी एवढीच इच्छा आहे. तो दिवस कधीं उगवेल ? ती वेळ कधी येईल ? केवळ आपलीच—सौ. तारा. "

आणि तो दिवस खरोखरीच उगवला. उगवला याचा अर्थ ताराच्या पत्राचें उत्तर आलें. आज दोन वर्षें सतत पत्रांचा पाऊस पडल्यानंतर एक दिवस महेश्वरपंतानी चार ओळी लिहिल्या. " तुझी सर्व पत्रं मिळालीं. मी खरोखर नालायक मनुष्य आहे. तूं मात्र देवता आहेस. तुझा जो इतके दिवस मी छळ केला त्याचं मला अतिशय दुःख होतं. आजचं तुझं पत्र वाचलं आणि वाटलं, कीं लगेच तुला भेटावं. तुला घेऊन यावं आणि जन्मभर तुझ्या पायाशीं बसून संसार करावा. खरोखर, तारा, झाल्या अपराधाची मी तुझ्याजवळ क्षमा मागतो. मी विमानानंसुद्धां आलो असतो. वारा होऊन आलो असतो. पाऊस होऊन आलो असतो. पण माझ्याच नादानपणानं मी आज भलत्या स्थितीला येऊन पोचलो आहे. जवळ खायलासुद्धां पैसा नाहीं तर येऊं कुठून ? भाड्याला पैसा नाहीं तर येऊं कसा ? तारा, तूं माझी बायको आहेस. माझ्यावर तुझं प्रेम आहे—तर तूं मला तुझ्याजवळचे पैसे पाठव. पैसे मिळतांच मी पहिल्या गाडीनं येतो. सर्वस्वी तुझाच—महेश्वर. "

ताराला आनंदानें वेड लागायची वेळ आली. एकदां तिला असें वाटलें कीं आपणच तिकडे जावें. पण मग वाटलें कीं नको. त्यांच्या मनासारखें होऊं दे. ते येणार आहेत तर त्यांनाच येऊं दे. आपण कशाला आपल्या मनानें वागावें ? तेव्हां तारानें पोष्टांत जाऊन आपली आजपर्यंत टाकलेली सर्व शिल्लक आणली आणि तावडतोब पाठवून दिली. पुन्हां लिहिलें कीं " हें मला आधींच कां कळवलें नाहीं ? आपण हाल करून घेऊं नये. आपण आतां लौकर यावें. मी वाट पहाते. "

आणि तारानें घराला रंग दिला. लाडू, चिवडा करून ठेवला शाळेंतून चार दिवसांची रजा घेतली. एक नवी चादर आणली. एक पांघरूण आणलें. आणि ती महेश्वरपंतांची वाट पाहूं लागली रोजच्या रोज ती स्टेशनवर जाऊं लागली.

आणि निराश होऊन परत येऊं लागली. एकदां आली, दोनदां आली, चारदां आली. आणि मग तिची रजा संपून गेली. तिला शाळेंत जावें लागलें. आणि मग हळूंहळूं तिच्या लक्षांत आलें कीं महेश्वरपंत येणार नाहींत. तेहि येणार नाहींत आणि त्यांचें पत्रहि येणार नाहीं.

आणि त्याप्रमाणेंच झालें. तरी ताराची आशा सुटेना. एकदां तिला वाटलें कीं आपण स्वतः जाऊन पाहून यावें. पण महेश्वरपंतानीं ज्या तऱ्हेनें तिला घराबाहेर काढले होतें ती तिला आठवली.

आणि ती गप्प बसली. मग ती पुन्हां पत्रं लिहूं लागली. अशीं शेंकडों हजारों, लाखों पत्रें तारानें महेश्वरपंतांना लिहिलीं. पुण्याला येऊन तिला आतां पांच सहा वर्षें झालीं होतीं. एवढ्या अवधींत तारानें अक्षरशः पिंपळाचे पार झिजवले. देवांना बेलाफुलांच्या शेंकडों लाखोल्या वाहिल्या. शिवलीलामृताचीं शेंकडों पारायणें केलीं. आणि हें सारें करत असतांनाच तारा शरीरानें झिजत चालली. गंध उगाळून उगाळून एखादें चंदनाचें खोड झिजावें तशी तारा झिजत चालली. वाळून कोळून ती केवळ चिपाड होऊन गेली. तिची मान वर आली. गालांचीं हाडें दिसूं लागलीं. दांत पुढें येऊं लागले. कपाळावरची शीर दिसूं लागली. हातांवर शिरांचें जाळें तटतटूं लागलें, पहाणारांना वाटे, कीं सतत चोवीस तास तारानें आपल्याला मिरच्यांच्या धुरीवर टांगून घेतलें आहे.

आणि लोक म्हणूं लागले, कीं अशानें काय होणार आहे ? तिचे आईवडील, बहीणभावंडे म्हणूं लागलीं कीं हें सारें व्यर्थ आहे. सारें फुकट आहे. संतत धार धरली तर दगड झिजतो. पण महेश्वरपंतांच्या

नांवानें पूजलेला परमेश्वर कांहीं कधीं पाझरणार नाहीं. त्यांचे आपलें चालायचे ते उद्योग चालूंच आहेत. माणसाच्या नांवानें जगणाऱ्या त्या महेश्वराच्या अंतःकरणाला कधीं चिमटा बसणार नाहीं. कशाला हा देहजाळ ! कशासाठीं एवढी तपश्चर्या ? कशासाठीं हा मनःस्ताप ?

यापैकीं एकहि प्रश्नाचें उत्तर तारानें कधीं कोणाला दिलें नाहीं. एखाद्यानें रोजच्या रोज अग्निकाष्ठें भक्षण करावींत तसें ताराचें देहदंडन चालू होतें. मन तर जळतच होतें. पिचत होतें. हळूहळू तें थकूं लागलें. देह थकूं लागला तसें मनहि थकूं लागलें. दिव्यांतलें तेल संपत यावें तसा मनाचा जोम कमी होऊं लागला. देहाची वात संपूं लागली.

तेव्हां तारानें मग दुसरा निश्चय केला. आणि तोहि असाच निर्वाणीचा केला. वटपौर्णिमा चारपांच दिवसांवर आली होती. उद्यांपासून ताराचें उपोषण सुरूं व्हायचें होतें. उद्यांपासून पूजेला आरंभ व्हायचा होता. तर तीन दिवस अगोदरच तारानें नवऱ्याला पत्र लिहिलें, "आजपर्यंत हजारों, आणि लाखों पत्रं मीं आपल्याला लिहिलीं. आपण उत्तर दिलं नाहीं. आपली मर्जी ! मर्जी देवाची हेंच खरें ! पण आतां मी थकत चालले. तरीहि आपल्याइतकं प्रिय या जगांत मला कोणीहि नाहीं. आपण मला कधींच घेऊन जाणार नाहीं कां ? आपणाला तीं मंगलाष्टकं, ती सप्तपदी कधींच आठवत नाहीं कां ? आपण एक दिवस संसार केला आणि मी सौ. तारा महेश्वर दाते झाले याचें स्मरण मुळींच होत नाहीं कां ? आपण आज याल, उद्यां याल व मला घेऊन जाल या आशेवर मी इतकीं वर्षं काढलीं. पण आतां आयुष्य कंठेल असं वाटत नाहीं. इच्छा असूनहि मी आपल्याला सुख देऊं शकलें नाहीं याचं फार फार दुःख होतं. पण आतां हें शेवटचंच पत्र ! या पत्राचं उत्तर पाठवलं नाहींत किंवा आपण यला घेऊन जायला आलां नाहींत तर मी समजेन, कीं आपण या जन्मीं तरी मला नेणार नाहीं. व यापुढें मी आपल्याला पत्र पाठवून त्रास देणार नाहीं. याचं उत्तर येईल कां ? वाट पाहूं कां ?

सदासर्वदा आपलीच सौ. तारा.

तारानें पत्र पेटींत टाकलें आणि ती घरीं आली. अस्वस्थ मनानें तिनें रोजचे कार्यक्रम सुरूं केले. कधींहि पाहिली नसेल एवढ्या उत्कंठेनें तिनें दोन तीन दिवस पत्राची वाट पाहिली. आणि नेहमींप्रमाणेंच तिची निराशा झाली.

तिसऱ्या दिवशीं वटपौर्णिमेला आरंभ होता. तारानें स्वच्छ स्नान केलें. पांढरें शुभ्र पातळ परिधान केलें. आणि ती वडाच्या पूजेला गेली. सत्यवान्-सावित्रीची कथा आठवत, त्यांचें स्मरण करीत, त्यांना पुनः पुन्हां वंदन करीत तारानें वडाची पूजा केली. त्याला फुलें वाहिली. अक्षता वाहिल्या. वस्त्र अर्पण केलें. सुवासिनींच्या खणानारळानें ओट्या भरल्या. आणि सबंध रस्ताभर तारा हळदकुंकवाचें सडे शिंपत शिंपत घरीं आली. न खातां न पितां तारानें तीन दिवस उपोषण केलें. आणि तिन्ही दिवस तिनें पूजा केली. पत्र जाऊन आतां पांच सहा दिवस झाले होते. पण उत्तर आलें नाहीं वा स्वतः महेश्वरपंतहि आले नाहींत.

तरी ताराचा चेहरा या वेळीं खिन्न झाला नाहीं. उपोषणानें देह वाळून गेला होता तरी जणुं कांहीं थकला नव्हता. ताराची घोर निराशा झाली होती तरी जणुं मन फाटलें नव्हतें. एखाद्या गोष्टीसाठीं एखाद्या माणसाजवळ अनेक उपाय असले म्हणजे तो जसा नाउमेद होत नाहीं; शांत रहातो. तशी तारा शांत होती. स्थिर होती. अविचल होती. तिसऱ्या दिवशींहि तारानें अशीच वडाची पूजा केली आणि ती नेहमींप्रमाणेंच झोपीं गेली.

पण सकाळीं सात वाजले, आठ वाजले, नऊ वाजले तरी ताराच्या घराचा दरवाजा उघडला नाहीं. जी रोज पहाटें चारलाच उठून कामाला लागायची, ती सकाळीं नऊ वाजून गेले तरी कां उठली नाहीं म्हणून शेजारी चौकशी करूं लागले. तिच्या शेजारच्या बाईनें दारावर टकटक केलें. मग थोड्या वेळानें दारावर थापा मारल्या. "तारा, ताराबाई," अशा हाका मारल्या. तरी आंतून "ओ" येईना. तेव्हां सगळ्यांच्या तोंडचें पाणी पळालें. नाना शंका येऊं लागल्या. अखेर न राहवून कोणी तरी ताराच्या घराचा दरवाजा फोडायला सुरवात केली. वाड्यांतलीं सारीं माणसें दारापाशीं गोळा झाली होती. ताराला हाका मारत होतीं. बोलत होतीं. तर्क करीत होतीं. दरवाजा फोडणारा दारावर घाव घालतच होता. आणि अखेर कोणत्या तरी एका घावांत ताराचा दरवाजा मोडून पडला. माणसें एकदम आंत घुसून गेलीं. आणि तेवढ्याच जोरानें पुन्हां मागें लोटून आलीं. कोणी ओरडलें. कोणी किंचाळलें. कोणाला एकदम रडूंच कोसळलें. साऱ्यांनीं मिळून जें दृश्य पाहिलें, त्यानें सर्वांच्या अंतःकरणांत दुःखाचा डोंब उसळून आला. काळजें थरारून गेलीं. जीव गलबलून गेला. हृदयावर जणुं कुऱ्हाडीचे घाव बसले.

तारानें आत्महत्या केली होती ! आढ्याला टांगलेल्या एका गळफासांत मान अडकवून तारानें जीव दिला होता. लग्नीनसाडीप्रमाणें ती हिरवें लुगडें नेसली होती. हिरवी चोळी घातली होती. हातांत लग्नीनचुड्याप्रमाणें हिरव्यागार बांगड्या भरल्या होत्या. पायांत जोडवी विरवल्या होत्या. आणि लग्नांत महेश्वरपंतांनी दिलेल्या मोत्यांच्या कुड्या आणि मोत्यांची नथ तिनें घातली होती. तारानें कुंकवाचा मळवट भरला होता. पाठीवर केसांची काळीभोर, लांबसडक वेणी सोडली होती. आणि अशा साज शृंगारांत तारानें आपली मान फासांत अडकवली होती. तारानें जीव दिला होता.

ताराकडे निरखून पहातां पहातां कोणाची तरी नजर सहजच जमिनीवर गेली. तिथें एक पाकीट पडलें होतें. तें उघडेंच होतें. कोणी तरी तें उचललें आणि उघडलें. त्यांत एक पत्र होतें. आणि कांहीं नोटा होत्या. तें पत्र ताराचेंच होतें. तें पत्र तिनें शेजाऱ्यांना लिहिलें होतें. कीं "डोकें दुखी आणि पोटदुखी यांना कंटाळून मी आत्महत्या करीत आहे. याची जबाबदारी दुसऱ्या कोणावरहि नाहीं. माझ्या या पैशांतूनच माझें दहन करा. सौ. तारा महेश्वर दाते."

"तारा महेश्वर दाते !" कोणीतरी धांवत गेले आणि त्यानें पोलिसांत कळवलें. ताराचें पत्र आणि पैसे दाखल केलें. मग त्यानें ताराच्या आई वडिलांना तार केली. महेश्वरपंताना तार केली आणि धापा टाकत तो परत आला तेव्हां ताराच्या दहनाची परवानगी आली होती. ताराचे टांगलेलें प्रेत जमिनीवर ठेवण्यांत आलें होतें शेजारचीं बाया माणसें रडत होतीं. पुरुष माणसें हळहळत होतीं. पण नुसतें रडणें आणि हळहळणें याहे पलीकडचें दुःख प्रत्येकाला होऊं लागलें. आपणच कांहीं गुन्हा केला आहे असें वाटूं लागलें. ताराला आपणच छळलें असें भासूं लागलें. ताराचा खून आपणच केला असें

प्रत्येकाच्या मनांत येऊं लागलें. हें भीषण कृत्य झालें तरी कसें असा पश्चात्ताप दरेकाला होऊं लागला. हें अघटित घडूं न देण्यासाठीं आपण कांहींच कसें केलें नाहीं असें वाटूं लागलें. अरेरे! तारानें गळ्याला फांस लावून घेतलेला असतांनाच आपण तिच्या शेजारच्या खोलींत राहून चहा घेतला, आंघोळ केली, एकमेकांशीं गप्पा मारल्या......

संध्याकाळीं ताराचीं सारीं माणसें आलीं आणि ताराला त्यांनी कवटाळलें. ताराच्या आईनें ताराला मिठी मारली. तिची चुंबनें घेतलीं आणि आपल्या अश्रूंनीं तिचा अचेतन देह भिजवून टाकला. ताराच्या वडिलांना रडतां येत नव्हतें. ते घुसमटले होते, गुदमरले होते. भिंतीवर टांगलेल्या महेश्वरपंतांच्या छायाचित्राला घातलेली फुलांची माळ पाहून त्यांचा जीव गलबलत होता. आणि ते सारखे ताराच्या पाया पडत होते. वारंवार नमस्कार करत होते. ताराचे पाय त्यांनी असे धरलेले असतांनाच महेश्वरपंत आले. ते हळुहळू आले. एकेक पाऊल जडपणें उचलत, उचलत ते आंत आले. दुःखानें त्यांचा चेहरा काळवंडला होता. रडून रडून त्यांचे डोळे सुजले होते. भारावलेल्या पायांनी ते खोलींत आले. पण आंत येतांच त्यांना उमाळा आवरेना. ते धाडकन् ताराच्या अंगावर पडले. आणि गदगदत्या सुरांत हंबरडा फोडून म्हणाले, "तारा ग, अग तुझं पत्र मला एक दिवस उशीरां मिळालं ग. म्हणून मला यायला उशीर झाला. म्हणून मी तुला घेऊन जाऊं शकलों नाहीं ग. नाहीं तर मी तुला न्यायलाच आलों असतो. पण दुर्दैव माझं, कीं तुझं पत्र आणि तूं गेल्याची तार मला एकदमच मिळाली."

या चुकामुकीचें दुःख महेश्वरपंतांना इतकें अमर्याद झालें कीं ते मुळीं तारापासून बाजूलाच होईनात. त्यांनी तिची चुंबनें घेतलीं. तिच्या तोंडावरून हात फिरवला. तिला मिठी मारली. तिच्या पायांचेंसुद्धां त्यांनीं वारंवार मुके घेतले. महेश्वरपंतांना इतके दुःख झालें कीं कोणी कशीहि समजूत घातली तरी त्यांना आळा म्हणून बसेना. आजूबाजूला माणसें असून आपण काय करीत आहोंत याचेंसुद्धां भान त्यांना उरलें नाहीं. ताराला कुठें ठेऊं आणि काय करूं असें त्यांना होऊन गेलें. त्यांना तिच्याशीं बोलायचें होते. ते सारखे बोलतच होते. "तारा, माझी तारा," म्हणत होते.

अखेर ते ताराच्या तोंडाजवळ वाकले......पण पुन्हां मान वर करून साऱ्या मंडळींना म्हणाले, "जरा कृपा करून बाहेर जाल कां?"

सगळीं माणसें मुकाट्यानें बाहेर गेलीं. ताराचे आईवडीलसुद्धां गेले. "मेल्यावर प्रेम करून उपयोग काय?" असें स्वतःशीं म्हणत म्हणत बाहेर गेले.

मग महेश्वरपंतानी दार लोटून घेतलें. आणि ते ताराच्याजवळ येऊन बसले. ते ताराच्या तोंडाजवळ वाकले आणि...आणि...तिच्या कानांत म्हणाले, "तारा, सगळ्या लोकांना मी मगाशीं सांगितलं तें खोटं. त्यांच्याशीं मी खोटं बोललों. पण तुला मात्र मी खरं सांगतों. आयुष्यभर मी तुझ्याशीं खोटं वागलों. खोटं बोललो पण आतां मात्र मी तुला खरं खरं सांगतों, कीं तुझं पत्र मला मिळालं होतं. योग्यवेळीं मिळालं होतं. होय, खरोखरच, तुझं पत्र मला मिळालं होतं. आणि तरीहि मी आलो नाहीं.—तारा...तारा..."

महेश्वरपंत दुसऱ्या कांनाजवळ वाकले आणि म्हणाले, "आणखी एक खरी गोष्ट तुला सांगायची राहिली तारा, कीं या तुझ्या कानांतल्या कुड्या, या खऱ्या नाहींत. तुझ्या नाकांतली ही नथ, ही खरी नाहीं. ही जर खरीं असतीं तर मी तुझ्या बांगड्या काढून घेतल्या तेव्हांच काढून घेतली असती. तेव्हां तुला मी फसवलं. आणि आतां मात्र मी तुला खरं खरं सांगतों, कीं आज तूं घातलेले हे दागिने हे खरे नाहींत. मुळींच खरे नाहींत. तारा,...तारा..."

महेश्वरपंतांचा सूर चढत चालला. क्षोभ वाढत चालला तेव्हां कोणीतरी हळूंच दरवाजा किलकिला केला. हळूहळू उघडला आणि महेश्वरपंत म्हणत होते कीं, ""तारा, अग तुझं पत्र मला एक दिवस उशीरां मिळालं आणि माझा घात झाला. एक दिवस उशीर झाला आणि तूं मला सोडून गेलीस. तुझं पत्र...तुझं पत्र...तारा, तारा गऽऽ" महेश्वरपंतांनी हंबरडा फोडला आणि त्यांनी ताराला पुन्हां एकदां मिठी मारली.

• • •










अनुक्रमणिका

Dipāvali Monthly May 1959
REGD. NO. B-7640






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका